प्रा. डॉ. उषा वि. करंबेळकर

## पुराणातील सुपरिचित पण गूढ व्यक्ती

# ‘सती सावित्री’

---

### प्रस्तावना

पतिव्रता सावित्रीची कथा महाराष्ट्रात सर्व स्त्रियांना चांगली परिचित आहे; कारण ज्येष्ठात सावित्रीचे त्रिरात्र व्रत सर्व महाराष्ट्रातील स्त्रिया पतीच्या आयुर्वर्धनासाठी नियमाने आचरतात. या सुप्रसिद्ध सावित्रीबद्दल गूढ काय आहे? तेच जाणून घेण्यासाठी सावित्रीच्या कथेची चर्चा येथे करावयाची आहे.

सावित्रीची कथा महाभारतात (वन. २९३-३००), मत्स्य पुराणात (२०७–२१३), देवी भागवतात (९-२६–२८) व ब्रह्मवैवर्तपुराणातही (२.२३-२४) येते. या तीन पुराणातून येणारी कथा दुय्यम स्वरूपाची आहे. मत्स्य पुराणात या कथेच्या द्वारे निसर्गवर्णन केले आहे. तर ब्रह्मवैवर्त व देवी भागवत यांनी या कथेच्या माध्यमातून कर्मविपाक व नरकयातना यांची वर्णने आणली आहेत. या कथेत सावित्री व यम-संवाद येतो म्हणून यमाच्या मुखातून नरकातील जीवांच्या कर्माची यातनारूप फले वर्णन करण्यास चांगली संधि मिळते. तिचा उपयोग त्यांनी करून घेतला. ही कथा तैत्तिरीय ब्राह्मणात येते. पण हिचे पूर्ण व शुद्ध स्वरूप महाभारतावरून समजते. रामायणासही (२.३०.६; ११८.१०) ही कथा चांगली ठाऊक आहे. ती कथा थोडक्यात अशी–

### सावित्रीची कथा

मद्र देशात शाकल अश्वपतीनामक राजा राज्य करीत होता. त्याच्या राणीचे नाव मालवी (मालती?) होते. त्याला पुत्र नव्हता, पुत्र व्हावा म्हणून त्याने ऋषि वसिष्ठाच्या अनुज्ञेने सावित्रीची (गायत्री ऋ. वे. ३.६२.१०) उपासना केली, तेव्हा सावित्रीने प्रसन्न होऊन तुला एक कन्या होईल असा वर दिला. कालान्तराने त्या राजाला एक मुलगी झाली. ती सावित्रीच्या कृपेने झाली म्हणून तिचे सावित्री





नाव ठेवण्यात आले. ती अत्यन्त सद्गुणी व सुंदर मुलगी होती. ती वयात आल्यावर राजाने तिला स्वतःसाठी वर शोधून काढण्यास सांगितले. कारण कोणीच राजा आपण होऊन तिला मागणी घालत नव्हता. पित्याच्या आज्ञेने ती बरीच हिंडली व शेवटी घरी परत आली. त्यावेळी नारदमुनि राजाजवळ बसले होते. पित्याने तिला 'कोणाला वर म्हणून पसंत केलेस?' असा प्रश्न विचारताच तिने शाल्व देशाचा राजा द्युमत्सेनाचा पुत्र सत्यवान् पती म्हणून निवडल्याचे सांगितले. द्युमत्सेन अंध होता. त्याच्या दायादांनी त्याचे राज्य हिसकावून घेतले होते. व त्याला पत्नीपुत्रासह अरण्यवासास पाठविले होते. नारदांनी मग सत्यवानाची माहिती सांगितली. सत्यवान् सत्य वान्, गुणी, रूपशीलसंपन्न राजपुत्र होता; व सावित्रीला अगदी योग्य वर होता. फक्त एकच मोठे संकट होते. ते म्हणजे त्या दिवसापासून बरोबर एक वर्षाने त्याचा मृत्यू होणार होता. राजाने "अल्पायुषी पति वरू नकोस, दुसरा एखादा बघ" असे वारंवार सांगून देखील ती निग्रही स्त्री या गोष्टीला कबूल झाली नाही. ती म्हणाली –

"सकृदंशो निपतति सकृत्कन्या प्रदीयते ।
सकृदाह ददानीति त्रीण्येतानि सकृत् सकृत् ॥ (म. भा. २९४.२६)

– आहुति अग्नीत एकदाच पडते. कन्या एकदाच दिली जाते व देतो असे एकदाच म्हटले जाते. यामुळे सावित्रीचा अल्पायु सत्यवानाशी विवाह करून देण्यात आला. पतीच्या मृत्यूचा दिवस सावित्रीला नक्की ठाऊक होता पण ती कोणाशी त्याबद्दल बोलली नाही. या गोष्टीला वर्ष लोटण्यास तीन दिवस अवधी होता. तेव्हा तिने सासूसासऱ्यांच्या अनुज्ञेने त्रिरात्र व्रत घेतले म्हणजे कडकडीत उपवास व अन्य नेमधर्म पाळले. तिसऱ्या दिवशी ती पतीबरोबर रानात लाकडे, फळे, फुले आणण्यास गेली. लाकडे फोडत असता सत्यवानास शिरोवेदना उत्पन्न झाली. तेव्हा सावित्रीने सत्यवानाचे मस्तक मांडीवर घेतले व त्याला डोळे मिटून निजण्यास सांगितले. इतक्यात यम आला –

मुहूर्तादेव चापश्यत् पुरुषं रक्तवाससम् ।
बद्धमौलिं वपुष्मन्तं आदित्यसमतेजसम् ॥
श्यामावदातं रक्ताक्षं पाशहस्तं भयावहम् ॥ (म. भा. २९७.८–९)

त्याने सत्यवानाभोवती पाश टाकून–

ततः सत्यवतः कायात्पाशबद्धं वशं गतम् ।
अंगुष्ठमात्रं पुरुषं निश्चकर्ष यमो बलात् ॥ (२९७.१७)

याप्रमाणे सत्यवानाच्या आत्म्याला बांधून यम दक्षिणाभिमुख निघाला.

यमस्तु तं ततो बद्ध्वा प्रयातो दक्षिणामुखः ।

सावित्री यमामागून जाऊ लागली. त्या दोघांचे रस्त्यात बरेच संभाषण झाले. यम सावित्रीची नम्रता, पातिव्रत्य, ज्ञान, निष्ठा, निग्रह आदि गुणांनी प्रसन्न झाला व त्याने द्युमत्सेनास नेत्र व राज्य, अश्वपतीस शंभर पुत्र, सत्यवानास चारशे वर्षे आयुष्य व त्यापासून सावित्रीस शंभर पुत्र होतील असे वर दिले.

## परीक्षण

या कथेचे परीक्षण केल्यानंतर आपणास काही गोष्टी अगदी स्पष्ट दिसतात. सत्यवान् व सावित्री ही मुळात विशेष नामे नव्हेत. ती कृत्रिम; काही कारणावरून दिलेली दिसतात. तसेच ' अश्वपति ' हे राजाचे नाव विशेष लक्षात ठेवण्यासारखे आहे, त्याच्या पत्नीचे नाव ' मालवी ' होते. म्हणजे ती मालव गणातील कोणा प्रमुखाची कन्या असावी. द्युमत्सेन हा शाल्व देशाचा राजा म्हटला आहे. व राज्यभ्रष्ट होता म्हणजे आपल्या देशातून लांब अरण्यात रहात होता. ते अरण्य मद्र देशाच्या आसपास असावे. अश्वपतीने आपली मुलगी सत्य-वानास करून घ्या असे म्हणताच प्रथम द्युमत्सेनाने अनेक कारणे सांगून संबंध नाकारला व शेवटी तो कबूल झाला. प्रथम नाकारण्यास काय कारण असावे ? शिवाय कथेत काहीच वाटा–वळणे नाहीत, काही अद्‌भूत किंवा चमत्कृतिपूर्णता नाही. सावित्री यमामागून गेली व ' तिने त्यापासून आपल्या मनासारखे वर मागून घेतले. हे खरे आहे. पण सावित्री यमलोकात गेली असे कोठेही म्हटलेले नाही. आणि म्हणूनच सावित्रीच्या कथेचा शोध घेण्याची आवश्यकता वाटू लागते.

## मुलगी देण्याची प्रथा

महाभारताच्या आदिपर्वात ( अ. ११३. ) भीष्मांनी मद्र देशात जाऊन शल्यराजाजवळ त्याची मुलगी माद्री हिची पांडूसाठी मागणी घातली. तेव्हा शल्य म्हणतो, ' आपण म्हणता तो वर ( पांडु ) माझ्या बहिणीस अनुरूपच आहे. त्याहून चांगला वर कोठे आहे ? तथापि आपण बरे म्हणा वा वाईट म्हणा आम्हा मद्रदेशीयात एक प्रथा आहे. ती पूर्वापार चालत आलेली आहे. ती तोंडाने मला बोलून दाखविता येत नाही व ' देहि " असे म्हणणे उचित वाटत नाही. पण मुलीबद्दल द्रव्य घेणे हा आमचा कुलधर्म आहे– आपणास तो ठाऊक असेलच –

" न हि मेऽन्यो वरस्त्वत्तः श्रेयानिति मतिर्मम ।<br>
पूर्वं प्रवर्तितं किञ्चित् कुलेऽस्मिन्नृपसत्तमैः ॥<br>
साधु वा यदि वा ऽसाधु तन्नातिक्रान्तुमुत्सहे ।<br>
व्यक्तं तद्‌भवतश्चापि विदितं नात्र संशयः ॥

न च युक्तं तथा वक्तुं भवान् देहीति सत्तम।
कुलधर्मः स नो वीर प्रमाणं परमं च तत् ॥

( महाभा. आदि ११३. ८–११ )

भीष्माने या प्रथेचा मान राखून पांडुसाठी माद्री विकत घेतली, शल्याला सोने, चांदी, रत्ने वगैरे धन दिले ( ११३.१३ ). अश्वपति राजाने सावित्री सत्यवानास देण्याचे म्हणताच द्युमत्सेनास सावित्रीसाठी धन द्यावे लागेल की काय ही भीती वाटली. तो त्यावेळी राज्यभ्रष्ट होता; व मुलीच्या मोबदल्यात देण्यासाठी त्याच्याजवळ काहीच नव्हते. पण अश्वपतीने सत्यवानास सावित्री देऊन टाकली कारण सावित्रीनेच सत्यवानास वरले होते. मद्र देशातील ही एक प्रथा अनार्य होती. हे लक्षात घेतले पाहिजे.

## मद्र देशाची माहिती

मद्र देशात आणखी किती तरी वाईट गोष्टी होत्या. कर्ण-पर्वात शल्य सारथ्य करत असता कर्ण व शल्य यांचा जो कलहप्राय संवाद घडला त्यातून मद्र देशातील रीतिरिवाजांची चांगली माहिती मिळते. ( महाभा. कर्ण ४४-४५ ) मद्र देशाला पृथ्वीचा 'मल' म्हणतात (४५-३७) कृतघ्नता, परवित्तापहार, मद्यपान, गुरुदारावमर्श, वाक्पारुष्य, गोवध, रात्री घराबाहेर फिरणे, परवस्त्रोपभोग, भ्रूणहत्या ( ४५.२९-३८ ) हे मद्रकांचे नित्य दोष होते. मित्राचा द्रोह करणे हे मद्रकाचे लक्षण होते.

मित्रध्रुड्. मद्रको नित्यं यो नो द्वेष्टि स मद्रकः।
मद्रके संगतं नास्ति क्षुद्रवाक्ये नराधमे ॥ ( कर्ण ४०.२३ )

– मद्र देशातील स्त्रिया अनाचारसंपन्न होत्या. त्या मद्यप्राशन करून 'नग्न नृत्य' करीत असत.

क्षत्रियस्य मलं भैक्ष्यं ब्राह्मणस्याश्रुतं मलम्।
मलं पृथिव्यां वाहीकाः स्त्रीणां मद्रस्त्रियो मलम् ॥ (कर्ण. ४५-२३)

– मद्र देशात प्रत्येक घराच्या दरवाज्यात एक 'गोवधस्थान' होते व प्रत्येक चौरस्त्यावर 'मद्यशाळा' होती. 'ऐड' नावाचा एक खाद्य पदार्थ मद्रकांचा अतिप्रिय होता व तो बाजारात विकला जात असे. हे लोक आपले अन्न लाकडी व मातीच्या भांड्यात शिजवत व खात असत. धाना, गौडी सुरा, अपूप, गोमांस, पलाण्डु व लशुन या गोष्टी मद्रकांच्या नित्य आहारात असत. त्यांचे गायन उष्ट्र व गर्दभ यांच्या आवाजासारखे होते. उंट, गाढव व खेचर ही जनावरे तेथे नित्य भारवाहक होती. बकरीचे, उंटिणीचे व गाढवीचे दूध हे लोक पीत असत.

मद्र देशात शमी, पीलु व करीर वृक्षांची वने होती. येथील लोक कंबल व अजिन परिधान करीत असत. ’

मद्र देश “ वाहीक ” भाग म्हणविला जात असे. वाहीक=बाहीक म्हणजे बाह्य देश. आर्य देशाच्या बाहेरचे देश बाहीक देश होते. ( पाणिनि सूत्रावरील कात्यायनाचे वार्तिक. ) यांनाच “ आरट्ट ” म्हणत. ‘आरट्ट’ म्हणजे अराष्ट्र–अव्यवस्थित व अनाचारसंपन्न देश. असे म्हणतात की विपाश् नदीमध्ये दोन पिशाचे होती– एक बहिः व दुसरे हीक. त्यांची अपत्ये तीच बाहीक बनली. ( कर्ण. ४४.४१ ) हे लोक वेदांना मानत नव्हते. यज्ञधर्म मानत नव्हते. त्यामुळे देवता त्यांच्या घरी आहुति घेत नसत. म्हणूनच बाहीक देशातील लोकांना “व्रात्य ” म्हणत असत. या देशातील ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे सर्व प्रकारे राहू शकत म्हणजे त्यांच्यात धर्मसंकर होता. ते आपल्या बहिणीशी देखील विवाह करीत. ( ४५.१३ ) हे लोक आर्य होते पण आचारभ्रष्ट होते.

मद्रकाः सिन्धु सौवीराः
धर्मं विद्युः कथं त्विह ।
पापदेशोद्भवा म्लेच्छा
धर्माणामविचक्षणाः ॥ ( कर्ण. ४०.४२ )

## मद्र देश कोठे आहे ?

बाहीक देशात त्याकाळी पुढील देश येत असत. प्रस्थल, मद्र, गान्धार, आरट्ट, खश, सिन्धु व सौवीर. शतद्रु व इरावती नद्या ओलांडून या देशात जाता येत असे. याशिवाय रस्त्यातील विपाशा, चन्द्रभागा, वितस्ता व सिन्धु आणि तिच्या उपनद्यांच्या पलीकडे बाहीक देश होते.

बहिष्कृता हिमवता गङ्गया च बहिष्कृताः ।
सरस्वत्या यमुनया कुरुक्षेत्रेण चापि ये ॥
पञ्चानां सिन्धुषष्ठानां नदीनां येऽन्तरे श्रिताः ।
तान् धर्मबाह्यानशुचीन् बाहीकानपि वर्जयेत् ॥ (कर्ण. ४४.६–७)

– महाभारताच्या सभापर्वात नकुलाने या उत्तर पश्चिमेकडील देशात दिग्विजय केल्याची माहिती येते. त्याने प्रथम रोहीतक ( रोहटक )गिरि जिंकला. नंतर मरुभूमि ओलांडली व शिबि, त्रिगर्त, मालव, अंबष्ठ, सिन्धूच्या तीरावरील देश, पञ्चनद प्रदेश, अमरपर्वत, हारहूण, प्रतीच नृप जिंकून मग तो मद्रदेशाची राजधानी “ शाकल ” कडे वळला. या देशाच्या दक्षिणेकडे असलेले म्लेच्छ, बर्बर, पल्हव, किरात, यवन यांचा त्याने पराभव केला, व थेट समुद्रापर्यंत

पोहोचला. येताना त्याने हजारो उंट आणले. मद्र देश हिमालयाच्या पलिकडे आहे. ( ऐ. ब्रा. ८.१४.३ व बृ. उ. ३.३.१; ७.१ )

ययातीच्या पाच मुलांपैकी अनूच्या वंशजात महाशाल आणि महामनस् हे दोन पराक्रमी राजे झाले. महामनस् चक्रवर्ती होता व सप्तद्वीपांचा राजा होता. त्याचे दोन पुत्र उशीनर आणि तितिक्षु, या दोहोमुळे अनूंचे दोन भाग पडले. औशीनर पंजाबच्या पूर्वेकडे, तेच यौधेय, अंबष्ठ, नवराष्ट्र इ. शिबी औशीनराने पंजाबच्या पश्चिमेकडे आपल्या राज्याचा विस्तार केला. आणि चार राज्ये स्थापिली. ती म्हणजे मद्र, केकय, वृषदर्भ व सौवीर. ही सर्व राज्ये पंजाबच्या उत्तरपश्चिमेकडे होती व आजच्या बलुचिस्थान, अफगाणिस्थान, इराणचा व इराकचा उत्तरभाग या भागावर होती. याप्रमाणे मद्र देश म्हणजे प्राचीन काळचा मीडिया देश होय याबद्दल संशय उरत नाही. वर वर्णन केलेली सामाजिक परिस्थिती तंतोतंत मीडीयाला लागू पडते.

## मीडिया

या देशाचा इतिहास अद्यापि अंधारात आहे. मीड लोकांचे जीवन व त्यांच्या संस्था अद्यापि पूर्णतया ज्ञात नाहीत. त्यांचे साम्राज्य मोठे होते पण त्याचे अवशेष फारच थोडे उरले आहेत. मीड लोक आर्य होते पण मीडियाची प्रजा संमिश्र होती. त्यांच्या साम्राज्यात इराण, हिर्कॅनिया, पार्थिया, बॅक्ट्रिया इ. प्रदेश येत होते. ( Ragozin-Media )

मीड लोक पूर्वीपासूनच काळा समुद्र व कास्पियन समुद्र यांच्या मधील भूभागात रहात असत, ते आर्य होते व त्यांचा इराणी लोकांशी निकट संबंध होता. ते एशिया मायनर व पार्शियाच्या उत्तर भागात ( अझर बैजान– आर्यन वैजो– अवेस्ता ) रहात होते. याच भागाला मीडिया म्हणत असत. त्यांचा सर्वात मोठा राजा डारियस I ( बायबलमध्ये उल्लिखित ) होऊन गेला. मीडियाचे साम्राज्य पूर्वेकडे भारताला येऊन भिडले होते.

इ. स. पूर्व २००० च्या अंदाजात कास्पियन समुद्रापासून भारतापर्यंत सर्व भागात आर्य वसाहती पसरल्या होत्या हे बोगॉझ कोई इष्टिका लेख ( इ. स. पूर्व १८०० ) व टेल्–एल्–अमनो लेखपत्रांवरून समजते. बोगॉझ् कोई लेखात इन्द्र, वरुण, नासत्य व मित्र या आर्यदेवतांच्या साक्षीने मितन्नी नृपाने हिट्टाईट लोकांशी युद्ध–विराम केला होता. यावरून मेसोपोटेमियाच्या प्रदेशात अर्ततम, तुषरत्त ( मितन्नी नृप ), सुतर्ण इत्यादि आर्यनामांकित नृप राज्य करीत होते हे सिद्ध होते. इ. स. पूर्व १७४६–११८० या पाचशे वर्षात कस्साईट नामक लोक-

अनुक्रमणिका







समूह मिडियावर राज्य करीत होता. यांचे संपूर्ण बॅबिलॉनवर आधिपत्य होते. या जमातीचे लोक मितन्नीप्रमाणे आर्यवंशीय होते. हे त्यांच्या नृपनामावरून व देवतानामावरून ठरते. 'शूरियस्' ( सूर्य ), 'मर्यतस्' ( मरुत् ) अशी त्यांच्या देवतांची नामे होती. इराणी लोक आर्यवंशीय होते हे सर्वप्रसिद्ध आहे. याप्रमाणे आर्यवंशीय राजे अतिप्राचीन काळापासून मद्र देशात राज्य करीत होते हे व त्यांच्या दक्षिणेस इराणी या आर्यवंशीयांचे राज्य होते असे ठरते.

## कथेची उपपत्ती

सावित्रीचा पिता अश्वपति मद्र देशचा राजा होता हे महाभारत व पुराणे एकमुखाने सांगतात. म्हणजे सावित्रीची कथा मीडियातील आहे हे ओघानेच येते. सावित्रीचा श्वशुर द्युमत्सेन हा जरी शाल्व देशाचा राजा होता तरी तो राज्यभ्रष्ट व वनवासी होता. सावित्रीने सत्यवानाशी विवाह करण्याचे ठरविले तेव्हा तो तिला अरण्यातच आढळला व ते अरण्य मद्रदेशाच्या आसपासच असले पाहिजे. व तेथेच सत्यवानाचा मृत्यु व यमाशी भेट होऊन सावित्रीने सत्यवानाला परत मिळविले असले पाहिजे. याप्रमाणे सावित्री व सत्यवानाची कथा मद्र देशाच्या दक्षिणारण्यात इराणच्या सरहद्दीवर घडलेली असावी. अश्वपति, सावित्री, सत्यवान् इत्यादि नावे मुद्दाम बनवलेली वाटतात. अश्वपति नावाचे विश्ताश्प, गुश्ताश्प इत्यादिचे इराणी नावांशी साम्य आहे. अश्वांचे महत्व त्या बाजूस फार होते. त्या भागातले घोडे उत्तम समजले जातात. मद्र देशाचा राजा शल्य हा अश्वांचे शास्त्र चांगले जाणणारा होता. म्हणूनच त्याला कर्णाचा सारथी हो अशी दुर्योधनाने विनंती केली. ( कर्ण पर्व. ३१.६०–६५ ) सावित्री नाव गायत्री मंत्रावरून पडलेले आहे तर सत्यवान् हे तर अगदीच कृत्रिम वाटते. म्हणजे ही सर्व नावे कथेतील दुसऱ्या कोणत्या तरी मूळ नावाच्या ऐवजी महाभारत, रामायण, पुराणादि ग्रंथांना मिळाली असावीत व हे काम ही कथा मीडियातून इकडे आली तेव्हाच घडले असावे. यम–सावित्री यांची भेट व संवाद यावरून ही कथा इराण व मीडिया सरहद्दीवरून इकडे आली आहे. या गोष्टीला सबळ पुरावा मिळतो.

## यम = यिम

शिरोवेदनेने व्याकुळ झालेला सत्यवान् अरण्यात सावित्रीच्या मांडीवर डोके ठेवून निजला असता यम आला व त्याने सत्यवानाच्या अंगठ्या एवढ्या आत्म्याला बांधून तो दक्षिणेकडे जाऊ लागला असे आपण महाभारतातील उल्लेखावरून पाहिले. यमाची दक्षिण दिशा आहे असे तेव्हापासूनच भारतीय संस्कृति मानते.





ही अत्यन्त प्राचीन कल्पना आहे. त्यावरून सावित्रीची कथा तितकीच किंबहुना अधिक प्राचीन ठरते. मद्रदेशाच्या दक्षिणेस इराण देश आहे व त्या देशाचा प्राचीन सुवर्णयुगातील राजा यम = यिम होता. पवित्र अग्नींची पूजा यिम नृपाच्या काळापासून चालत आली. यिमानेच पवित्र अग्नींची स्थापना केली. अहुरमज्झद् या इराणी धर्मातील सर्वोच्च देवतेची इच्छा अशी होती की यिम नृपाने त्याच्या धर्माचा प्रसार करावा; ज्यायोगे उभय लोक सुखी होतील. यिम नृप झरथुष्ट्रापूर्वी होऊन गेला. यिम नृपाने अर्द्विसूर, वायू, अशिवंग्वुइ, द्रवस्प या देवतांना आहुति दिल्या व त्यांच्यापासून वर प्राप्त करून घेतले. यापैकी काही देवता शेती, धन-धान्य संपत्तीच्या होत्या. तर काही पावित्र्य, नैतिकता यांच्या होत्या. यिमाची प्रार्थना मृत्युपासून बचाव होण्यासाठी करतात; कारण या राजाने मृत्यू व दुःखे यांना आपल्या राज्यातून घालवून दिले होते. पण तोही मृत्यूचा भक्ष्य बनला. अहूरमज्झदाने यिमाला अमर बनविले होते पण अंग्र मैन्यूने त्याला मर्त्य बनविले. यावरून यिम राजा इराणमध्ये अत्यन्त प्राचीन काळात राज्य करीत होता. त्याने सत्यवान् नामक राजपुत्राला तो उत्तर सरहद्दीवरील अरण्यात एकाएकी आजारी झाला असता पकडून नेले व पतिव्रता सावित्रीने त्या राजाची समजूत घालून आपल्या पतीची सुटका केली, अशी मूळ कथा असावी. म्हणजे मूळ कथा वास्तव स्वरूपाची व मानवी होती. कालान्तराने तिला अद्भुत व आदर्श स्वरूप प्राप्त झाले. भारतीय संस्कृतीतील यम हाच इराणी संस्कृतीमधील यिमाचा आधार असल्यामुळे कथेला अद्भुतता प्राप्त होण्यास मदत झाली व यिम दक्षिणेकडील राजा होता म्हणून दक्षिण दिशा यमाची ठरली.

## निष्कर्ष

वरील चर्चेवरून पुढील निष्कर्ष निघतात —

अ ) सावित्रीची कथा मूळची मीडिया व इराण यांच्या सरहद्दीवरील आहे.

आ) रामायण, महाभारत व पुराणांनी ती कथा " सावित्रीच्या आदर्श पतिप्रेमाने तिने आपला पति यमा– ( यिमा ) पासून सोडवून आणला " या कीर्तीच्या आधारावर संग्रहीत केली. सावित्रीची प्रगाढ पतिनिष्ठा हाच या कथेचा मध्यवर्ती विचार आहे. त्यानेच यिमाचे मन मृदु बनले.

अनुक्रमणिका

इ ) कथेतील प्रमुख व्यक्ती मानवी होत्या पण पुराणांच्या यमविषयक कल्पनांमुळे कथेला अतिमानवी स्वरूप मिळाले. यिमाने सत्यवानास बांधून घेऊन जाण्यात त्याचा काही राजकीय हेतूही असावा.

ई ) मद्र देश भारताबाहेर इराणच्या उत्तरेस असलेल्या अझरबैजान ( इराणी-आर्यन वैजो ) प्रदेशात होता.

उ ) अश्वपति, सत्यवान्, सावित्री ही नावे परदेशीय कथेला भारतीय रूप देण्यासाठी बनविलेली आहेत. कथेतील बाकीची पात्रे द्युमत्सेन, त्याची राणी, अश्वपतीची राणी अगदी अस्पष्ट आहेत.

ऊ ) यिम ( यम ) राजाचे राज्य दक्षिणेकडे ( इराणमध्ये ) होते. म्हणून त्याचा दक्षिण दिशेशी संबंध जोडण्यात आला.

ए ) मद्र देशातील तत्कालीन चालीरीती, आचार-विचार, खाद्यपेये, प्रथा, वाहने इ. सर्व गोष्टी आजही त्या भागात तशाच पहावयास मिळतात.

ऐ ) मद्र देशाची प्रजा संमिश्र होती. पण तेथे आर्य राजांचे राज्य होते हे जसे महाभारतादि ग्रंथांवरून समजते तसेच अतिप्राचीन लेखावरूनही ठरते.





अनुक्रमणिका

प्रा. रा. ग. जाधव

# डॉ. म. ना. वानखडे यांचे अध्यक्षीय भाषण : एक अन्वय

डॉ. म. ना. वानखडे यांनी नागपूर येथे १७।१८ जानेवारीला भरलेल्या दलित साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेले भाषण अत्यंत विचार-प्रवर्तक आहे. मराठी साहित्याची आस्था असणाऱ्या सर्वांनीच त्याची दखल घेणे योग्य ठरेल. एवढेच नव्हे तर, मराठी साहित्य महामंडळानेही यापुढे दलित साहित्यिक व साहित्य यांची अधिकृतपणे दखल घेण्यासाठी आपल्या नित्य व नैमित्तिक कार्यात त्यांना सहभागी करून घेण्याची व त्यासाठी घटनात्मक तरतूद करण्याची वेळ आली आहे. हे कसे करावयाचे, हे सर्व संबंधितांशी चर्चा करून ठरवावे लागेल; पण ही आजच्या काळाची गरज आहे व ती दुर्लक्षून चालेल असे वाटत नाही.

डॉ. वानखडे यांच्या भाषणातील काही मुद्दे वादग्रस्त ठरणार नाहीत, असे नाही. कोणताही सांस्कृतिक–वाङमयीन विचार निर्विवाद असत नाही. तथापि दलितांच्या सांस्कृतिक चळवळीची एकूण भूमिका नीटपणे मांडण्याचे महत्त्वाचे कार्य डॉक्टरांनी केले आहे, यात शंका नाही.

दलित साहित्याची चळवळ ही मूलतः सांस्कृतिक परिवर्तनाची चळवळ आहे व म्हणून पारंपरिक भारतीय समाजाचे आधुनिकीकरण करण्याच्या प्रक्रियेतील ती अग्रगामी चळवळ आहे. हा महत्त्वाचा विचार डॉ. वानखडे यांनी ठाशीवपणे मांडलेला आहे. त्यामुळे दलित चळवळीला मराठीबाहेरचे व्यापक भारतीय अधिष्ठान त्यांनी दिले आहे व हे महत्त्वाचे आहे. 'पॅन-इंडियन' असे काहीतरी मौलिक या चळवळीत आहे व भारतीय परिवर्तनाच्या व्यापक उद्दिष्टाशी ती चळवळ निगडित आहे, हे कुणीतरी एकदा

स्वच्छपणे सांगण्याची गरज होतीच. ही भारतीयत्वाची विशाल अभिज्ञता लक्षात घेतली, तर डॉक्टरांचा हा विचार दलित साहित्य व समाज यांना व्यापक स्वप्ने बहाल करण्याचे ऐतिहासिक कार्य करणारा ठरतो.

या विचाराच्या अनुषंगानेच डॉक्टरांनी दलित साहित्यिक म्हणजे कोण, हे ठरविताना त्यात पददलितांचा कैवार घेणारा कोणताही लेखक अंतर्भूत केला आहे. अशा लेखकाची जातपात महत्त्वाची नसून मानव्याचा जातिभेदातीत पुरस्कार करणारा साहित्यिक दलित साहित्यिक ठरतो. या व्याख्येमुळे दलितेतर लेखकांनाही जाणवणारी मानसिक कुचंबणा दूर होईल व दलित साहित्याच्या वर्गात मुक्त प्रवेश करण्यास त्यांना मोकळेपणा लाभेल. दलित जीवन हा विषयही कुण्या विशिष्ट जातीजमातींचा खास विषय म्हणून मर्यादित होणार नाही हा विषय ोणत्याही भारतीय लेखकाला हाताळण्याचे स्वातंत्र्य राहील. मुख्यतः त्यासाठी जातीचे क्वालिफिकेशन असण्याची गरज उरणार नाही.

दलित साहित्य हे कुणासाठी अवतरते, या प्रश्नाचे उत्तर डॉ. वानखडे यांनी आपल्या मूळ भूमिकेशी सुसंगत ठरेल, असेच दिले आहे. दलित साहित्य हे दलित वाचकांसाठीच लिहिले जाते, हे त्यांनी आग्रहाने मांडले आहे. साहित्य हे नेहमीच स्वकीयांसाठीच असते. या दृष्टिकोनामुळे दलित साहित्यिकांना आपल्या अभिव्यक्तीसाठी कृत्रिम संकेतांचा वापर करणे टाळता येईल. पुष्कळसे अँग्लो-इंडियन लेखक ज्याप्रमाणे इंग्लिश वाचकवर्गासाठी लिहावयाच्या भूमिकेमुळे भारतीय जीवनाच्या खऱ्या वास्तवाऐवजी त्यासंबंधीच्या पश्चिमी समजांचे व अपसमजांचे चित्रण करतात, तशी स्थिती दलित साहित्यिकाची होऊ नये म्हणून त्यांनी दलित वाचकांसाठीच लेखन करावे, हे म्हणणे रास्त ठरेल. याचा अर्थ ते दलितेतरांनी वाचू नये, समजावून घेऊ नये, असा नाही. जातिधर्मातीत मानव्यप्रेमी हा जसा दलित साहित्यिक, तसाच जातिधर्मातीत साहित्यप्रेमी हा दलित वाचकवर्ग मानता येईल. रसिकता हेच त्याचे मुख्य लक्षण व अर्हता. त्यामुळे दलित वाचकवर्ग हादेखील व्यापक मानावयास हरकत नाही, अशी सूचना डॉक्टरांच्या प्रतिपादनातून लाभतेच.

भारतातील नवजात लोकशाहीच्या व आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेत एकजीव झालेली दलित चळवळ केवळ भावनाप्रधान असून वा राहून चालणार नाही. यासाठी विचारनिर्मितीचे व वैचारिक प्रबोधनाचे कार्य तिला अंगीकारावे लागेल व यालाही अखिल भारतीय पातळीच योग्य ठरणार. डॉक्टरांनी म्हणूनच वैचारिक लेखनाची गरज आपल्या भाषणात अधोरेखित केली आहे.

साहित्यिक तरल संवेदनक्षमतेने समाजाचे अंतर्जीवन जाणून घेत असला, तो समाजाचा 'अँटिना' असला, तरी जीवनाचा सखोल अर्थ लावण्याचे कार्य समाजातील वैचारिक वातावरणाच्या आधारेच प्रगत होत जाते. दलितांचे प्रश्न व्यापक लोकशाही मूल्यांशी निगडित असल्याने त्या मूल्यांच्याच अभिसरणाशी दलित विचारकार्याचा संबंध आहे. या जाणिवेमुळे दलितांच्या समस्यांना केवळ वर्गीय सीमा न राहता एकूणच सामाजिक विचार-कार्याशी त्या जुळल्या वा जुळविल्या जातील नवसमाजनिर्मितीत दलित वर्गाचे हितसंबंध निहित आहेत, म्हणून तिची आचही त्यांना अधिक हे खरे; पण दलितेतर समाजालाही या नवसमाजनिर्मितीत सहभागी झाल्याखेरीज गत्यंतर नाही. हा काळाचा रेटा थोपविता येणार नाही; म्हणून त्याला सामोरे जाणे निरुपायास्तव स्वीकारावे, ही भूमिका, खरे तर, दोन्ही समाजांना हितकारक ठरणार नाही. स्थितिवादाची काही सुखे असतात; पण ती गतिमान अशा सामाजिक विकासक्रमात फार काळ टिकत नाहीत; तेव्हा "कायदा पाळा गतीचा" हे आवाहन सर्वांनी स्वीकारले पाहिजे. डॉ. वानखडे जेव्हा लोकशाहीकरणाच्या कार्याची जबाबदारी मुख्यत्वे दलित समाजावर टाकतात, त्यावेळी दलितेतर समाजाच्या जबाबदारीची त्यांना जाणीव नाही असे नाही. दलितेतर समाजाला स्थितिवादात विरंगुळा लाभणे शक्य आहे, तशी अवस्था दलित समाजाची नाही हेच मुख्यतः त्यातून त्यांना सूचित करावयाचे आहे, असे दिसते.

लोकशाही मूल्ये व आधुनिकता यांच्या सामाजिक अंगवणासाठी जेव्हा एखादी चळवळ प्रकटपणे उभी राहते, तेव्हा तिला काहीएक ऐतिहासिक मीमांसा करणे भाग असते. इतिहासाशी किंवा परंपरेशी तिचे काहीएक रागलोभाचे नाते असते. आपल्या चळवळीला एका ऐतिहासिक विकासक्रमातील एखाद्या टप्प्यावर उभे करताना पूर्वकालीन परंपरेचे काहीएक मूल्यमापन तिला मांडावे लागते. दलित चळवळ ही एक ऐतिहासिक क्रमात उत्क्रांत झालेली सांस्कृतिक चळवळ आहे व म्हणून तिला गतकालीन गोष्टींचा काहीएक अन्वय लावावा लागतो. डॉ. वानखडे यांनी विशेषतः मराठी विचार आणि विचारस्वातंत्र्य तसेच साहित्य यांच्यावर संकुचित मध्यमवर्गीयत्वाचा आरोप केला आहे. जीवनाच्या नव्या वास्तवाचा वा समस्यांचा त्यांत काहीही विचार नाही असे म्हटले आहे लोकशाही मूल्ये व त्या संदर्भातील समाजाची व साहित्याची जबाबदारी मराठी साहित्यात जाणवत नाही, असे आपले निरीक्षण मांडले आहे. मराठी साहित्य कृत्रिम परपुष्ट, संकुचित आहे व ही कोंडी दलित साहित्य फोडू शकेल असा विश्वास व्यक्त केला आहे. नवे साहित्य किंवा नवी सामाजिक विचारप्रणाली ही परंपरेच्या असमाधानातूनच

निर्माण होते. हे असमाधान कसे व्यक्त करावयाचे, हा प्रश्न ज्या त्या विचारवंताने सोडवावयाचा असतो. मराठीतील नवसाहित्यावर डॉ. वानखडे यांनी जोरदार आक्षेप घेतले आहेत हे खरे; पण वस्तुस्थिती अशी आहे की नववाङ्मयाच्या पुरस्कर्त्यांनीही जुन्या मराठी साहित्यपरंपरेवर, डॉ. वानखडे यांच्याप्रमाणेच, जोरदार आक्षेप घेतले आहेत. महत्त्वाची गोष्ट एवढीच, की नव्या सांस्कृतिक चळवळीचे मार्गक्रमण योग्य दिशेने होण्यासाठी परंपरेची जी मोडतोड आपण करतो, ती त्या चळवळीलाच घातक ठरू नये. म्हणजे मराठी समाज आणि मराठी साहित्य यांच्या मुख्य धारेत नवा समाज आणि नवे साहित्य योग्य प्रकारे सामावले जाऊन त्या मुख्य धारेचा विकास घडून येईल, याचे भान राखले पाहिजे. अंतिम विश्लेषणात दलित समाज आणि दलित साहित्य भारतीय परंपरेतच सार्थ व समर्थनीय ठरतात. डॉ. वानखडे यांनी लोकशाहीचा आणि आधुनिकतेचा जो कालस्वर आपल्या विवेचनात सर्वत्र जपलेला आहे, त्यावरून ही गोष्ट अधिकच स्पष्ट होते.

दलित साहित्याच्या व चळवळीच्या संवर्धनासाठी विचारकार्याबरोबरच काही नव्या वाङ्मयीन जाणिवा रुजविणे आवश्यक आहे. विचारकार्यासाठी डॉक्टरांनी अमेरिकेतील 'न्यू जर्नॅलिझम' हा प्रकार सुचविला आहे. मराठीला हा प्रकार नवा नाही. मराठीतील स्फुट ललित निबंध हा अगदी लवचिक असा साहित्यप्रकार आहे. त्याची कास निश्चितच धरता येईल. दलित नाट्य व रंगभूमी ही तशी जुनीच आहे. तथापि तिचे आधुनिकीकरण लोकनाट्याच्या जुन्या तंत्राच्या अंगानेच करावे लागेल. नव्या पुराणाची निर्मिती हीदेखील दलित साहित्याची एक आकांक्षा आहे. यासाठी जीवनाचे सखोल दर्शन घडवू शकणाऱ्या महान प्रतिभावंताची गरज आहे. हे सारे करत असताना साहित्य-सौंदर्याच्या किंवा कलात्मकतेच्या संकेतांत आणि साच्यांत दलित साहित्यिकाने गुंतून पडू नये, हा समयोचित इशाराही डॉक्टरांनी दिला आहे. आपल्या सामाजिक जाणिवांच्या वास्तव अभिव्यक्तीची काळजी दलित साहित्यिकांनी घ्यावी, त्यातील कलात्मकतेची काळजी ती निर्मिती स्वतः होऊनच घेईल. सौंदर्यमूल्ये किंवा कलामूल्ये ही श्रेष्ठ अभिव्यक्तीची अनुगामी असतात, अग्रगामी नव्हेत.

डॉ. वानखडे यांच्या महत्त्वाच्या भाषणाचा अन्वय लावण्याचा हा प्रयत्न आहे. दलित साहित्य आता खरे तर वयात आले आहे. त्याच्या पुढील विकास–विस्तारासाठी त्याच्या अंगोपांगांची सर्व दृष्टींनी चर्चा सतत होत राहिली पाहिजे. यासाठी योग्य ती प्रकाशने सुरू केली पाहिजेत. दलित साहित्य केवळ

मराठीपुरतेच मर्यादित नाही. सगळ्या भारतातून महाराष्ट्राने सुरू केलेल्या या क्रांतिकारक साहित्यप्रवाहात प्रांतोप्रांतीचे प्रवाह येऊन मिळाले पाहिजेत. यासाठी इंग्रजी, हिंदी व मराठी असे त्रैभाषिक नियतकालिक सुरू करणे, ही एक गरज आहे. समाज, सरकार किंवा साहित्य अकादेमीसारख्या संस्था यांनी या बाबतीत पुढाकार घेतला पाहिजे. डॉ. वानखडे यांनी या बाबतीत पुढाकार घेतला, तर या ऐतिहासिक महत्त्वाच्या कामाचा शुभारंभ शीघ्रपणे होऊ शकेल. एका अत्यंत विचारप्रवर्तक भाषणाबद्दल डॉ. वानखडे यांचे मनःपूर्वक अभिनंदन !

◆ ◆ ◆

भाई माधवराव बागल

# सौंदर्याचे आकर्षण

---

कोल्हापुरास शुक्रवार पेठेत मी मामांच्या वाड्यात तिसऱ्या मजल्यावर रहात होतो. खिडकीतून बराच दूरवरचा भाग दिसे. तेथून पंचगंगा घाट फार जवळ. रंकाळा तलावही दूर नव्हता. फिरायला बाहेर पडायचे म्हणजे घाटावर किंवा रंकाळ्यावर.

## पंचगंगा घाट

नेहमीच्या जाण्यामुळं त्या जागेविषयी साहजिकच आपुलकी निर्माण झाली. केव्हाही जा, तेथे आराम वाटे. भर दुपारी गेलं तरी देवळात गार. झाडाची गर्द सावली भोवती.

आड जागी एकांती बसायचं झाल्यास कोणाचा त्रास होणार नाही. जागाही स्वच्छ. ज्या दिशेकडे पहावे तिकडे सुंदर देखावा.

देवालये, त्यांची शिखरे, दीपमाला, समोर तुटलेला मोठा कडा, खाली पूल, पुलापलीकडे नदी, वळणे घेत झुकाडी देत नटत मुरडत पदर सावरत जात आहे. तिने हिरवी शाल पांघरलेली आहे. तुटलेल्या कड्याचे, पुलाचे, देवळांचे आणि नदीवर धुण्यास आलेल्या स्त्रीपुरुषांचे प्रतिबिंब नाचत असलेले पाहून मला घरचाही विसर पडे.

संध्याकाळ झाली रे झाली की सृष्टी सारं रत्नभांडार घाटाच्या पायऱ्यावर फेकून देई. आकाशात उधळलेल्या साऱ्या मोहरा आणि विविध रत्ने पाण्यावर तरंगत तुमच्या पायाजवळ येऊन पडत. ती पायऱ्यावर आदळली की खळकन त्याचा आवाज होई. पण स्वार्थी माणसाचा हात लागला की ती रत्ने लगेच अदृश्य होत. जलाशयात विरून जात. हृदयाला गुंगवणारं आणि झुलवणारं गाणं मात्र थांबत नसे. तबल्याच्या ठेक्याप्रमाणे तो जलप्रवाह घाटांच्या पायऱ्यावर थाप मारत असे.

अनुक्रमणिका






शंभर दोनशे पाऊलावरच ब्रह्मपुरी टेकडी. तिथं बसलं की लकाकणाऱ्या सापाप्रमाणे वळसा घेत घेत अदृश्य होणारी गंगा. क्षितिजावर शांतपणे झोपी गेलेली टेकड्यांची रांग व त्यानी आपल्या अंगावर पांघरलेली निळी-गार शाल पहात बसण्यात मला कोण आनंद वाटे. त्या टेकडीच्या हिरव्यागार पठारावर अंग टाकून ढगांच्या चाललेल्या शर्यती व घटकोघटकी बदलणारी त्यांची अनंत स्वरुपे पाहण्यात, मला जगाचा विसर पडे. चांदण्या रात्री मी आठ आठ नऊनऊ वाजेपर्यंत तेथेच पडून राही व मला डुलकी लागे.

सं महिन्याच्या सुटीत ज्यावेळी मुंबईहून घरी परत जायला निघालो त्यावेळी आपल्या मंडळीना पाहण्याची मनाची घाई व उत्सुकता वर्णन करता येणे शक्य नाही.

गाडी शहराजवळ येऊ लागताच, आसपासच्या टेकड्या, ती नदी, पाह- ताना जणु काय ती आप्तांपैकीच आहे असे वाटे. नदीवरच्या माझ्या आवडत्या जागी मी केव्हा जाऊन बसेन आणि त्या सौंदर्याला डोळाभर पाहून घेईन, असे व्हायचे मला. जणु नदी तलाव टेकड्या ती झाडे ही माझी मित्रमंडळीच.

महाराजांच्या मुंबईतल्या पन्हाळा लॉज बंगल्यावर बडे बडे सरदारही उतरत. त्यांपैकी काही माझे जिवलग स्नेही होते. मला बरोबरच्याच नात्यात वागवत. खूप सलगी होती त्यांची माझी. मुंबईला आले की मला बरोबर घेतल्याखेरीज जाणार नाहीत. हॉटेलमध्ये गेलो की १००।१५० रु. जेवणावर खर्च करीत. वेटरकडून टिपसाठी ट्रे पुढे केला की १ रुपयाऐवजी ५।१० ची नोट टाकीत. सिनेमालाही नेहमी जात असू. भाड्याची मोटार दिवसभर फिरवली तरी बिलाचा विचार करायचा नाही. सहजी दोन अडीचशे बिल होणार. तथापि त्याना वाईट वाट नव्हता.

संध्याकाळ झाली होती. मी मोकळा होतो. साहेबानी मला आग्रहाने बोलावून गाडीत घेतले. दिवे लागण्याची वेळ झाली होती. पुष्कळ चकरा मारून झाल्यानंतर एका वस्तीत गाडी उभी केली. मी यापूर्वी या वस्तीत कधीच आलो नव्हतो. तथापि मला अंधुक कल्पना आली. गाडी उभी करताच रस्त्यावर उभे असलेले एक दोघे इसम मोटारीच्या दाराला बिलगले.

"चला साहेब. बघा तरी. अगदी नवा माल आला आहे." यांचा कसला सौदा चालला होता याची मला बरोबर कल्पना नव्हती, पण अंदाज करता आला. बायकांची कसली तरी भानगड असायची ! करू देत काहीही. तोपर्यंत आपण वेळ काढू मोटरमध्ये. या विचारात मी होतो, पण साहेबानी

अनुक्रमणिका

माझ्या दंडाला धरून "चल माझ्या बरोबर तुला गंमत दाखवतो" म्हणून पुढे घालून ढकलत नेले मला. माझा नाइलाज झाला !

तो माणूस पुढे, आम्ही मागे. जिना चढून वर गेलो. एका हॉलमध्ये त्या माणसाने आम्हाला बसवले. हॉलच्या मध्यभागी इलेक्ट्रिक झुंबराचे दिवे लागले होते. कोच व खुर्च्या भिंतीला टेकून ठेवल्या होत्या. मध्ये गालिचा अंथरला होता.

आम्हाला बसवून तो आत गेला. थोडक्याच वेळात तेथे चार स्त्रिया आल्या. त्यांच्या धंद्याची छाप त्यांच्या प्रत्येक हालचालीवर, दृष्टीत, त्यांच्या आवरणावरून, शृंगारावरून स्पष्ट दिसत होती. त्या पंजाब-कडील मुसलमान असाव्यात. अंगात रेशमी हिरवेगार साटिनचे पोलके, त्याला जरीचे काठ, वर झिरझिरीत तांबडी ओढणी, त्यावर पिवळे ठिपके, बोटात बऱ्याच आंगठ्या, मनगट दागिन्यानी भरलेले ! रेशमी पाय-जमा, तांबडा भडक, पायात जरीचे चढाव, त्यावर चांदीच्या छल्या, चाल-ताना छम् छम् आवाज करीत, कानात इअरिंग्स हलत होते. तोंड विड्याने भरपूर रंगलेले, वर्ण गोरा, पंजाबी चेहरा, रेखीव नाक, मराठी भाषा येत नव्हती कपड्याला अत्तराचा वास येत होता. देखण्या होत्या. पण त्या देखणेपणात गोडवा नव्हता. मोहकपणा नव्हता. मला त्यांच्याबद्दल आकर्षण मुळीच वाटले नाही.

मध्ये गालिच्यावर बसून त्यानी आम्हाला विडा करून दिला. श्रीमंतानी दहादहा रुपयाच्या दोन नोटा तबकात ठेवल्या. मला वाटलं गाणं ऐकायला किंवा नाच पहायला काय हरकत आहे ? साहेब म्हणाले 'लेका नाच तरी बघ. ठिकाणावर बसणार नाहीस.'

'गाणं अगर नाच आवडत नाही कुणाला ?' सर्वसाधारण मनुष्यात ज्या भावना असायच्या त्या माझ्यात होत्याच. जिज्ञासा होतीच, फुकट गंमत पहायला मिळते बिघडलं काय ?

गाण्याच्या तयारीला त्या आत गेल्या. पंधरा मिनिटे होऊन गेली. थोडक्याच वेळात तो माणूस श्रीमंताचे जवळ जाऊन म्हणाला 'साहेब होऊ दे का सुरवात ?' तो माणूस आत गेल्यावर श्रीमंत मला म्हणाले 'सरळ बस ना जरा आंवरून, अखडून नीट बैस चांगला.'

मी जरा ताठ बसलो व म्हणालो 'साहेब, आपल्याला दहाच्या शो ला जायचं आहे. ते विसराल, लवकर आटपायला पाहिजे ? 'नाच सुरू झाला म्हणजे म्हणशील राहू दे सिनेमा, आज इथंच राहू या.'

इतक्यात त्यांच्या पायातल्या छल्ल्यांचा व वाळच्यांचा आवाज कानावर पडला. त्या येऊ लागल्या असाव्यात. उत्कंठा साहजीकच वाढत गेली. त्यात श्रीमंतांच्या स्तुतीची भर पडली.

त्या आल्या. पण कशा ? आमची कल्पनाशक्ती उलथी पालथी झाली ! मी तर सदँच झालो ! गारठून गेलो ! हे दृश्य पाहण्याची माझ्या मनाची तयारी नव्हती. आश्चर्यांच्या धक्क्यानेच की काय मी भावनारहित झालो. मी त्या स्त्रियांच्याकडे धांदरटासारखा पाहू लागलो.

स्त्री जातीचा स्वाभाविक विनय, लाजाळुपणा तिला शोभा देतो. झरोक्यातून डोकावणारा चेहरा अधिक कुतूहल निर्माण करतो. पण या स्त्रिया आपली सर्व लाजलज्जा टाकून पूर्णं विवस्त्र अशा स्थितीत एकमेकीच्या हातात हात घालून नाचू लागल्या !

मला स्त्रियांचा तिटकारा होता म्हणून नव्हे किंवा मी साधुवृत्तीचा होतो म्हणून नव्हे पण त्यांच्या या अपवित्र निर्लज्ज व्यापारी नग्नतेचा मला तिटकारा आला. साऱ्या भावना गारठून गेल्या.

नग्नता अश्लील असं मी मानत नाही. नग्नतेतही पावित्र्य असतं. व्हीनसच्या विवस्त्र पुतळ्याने कामुकभावना जाग्या होत नाहीत. रॅफेल, मायकेल, एंजेलो यांच्या चित्रातील विवस्त्र स्त्रियानी कामुकभावना जाग्या होत नाहीत. माता आपल्या बालकाला स्तनपान देत असताना ती माता म्हणूनच आपण पाहतो--

त्या तशा कुरूप नव्हत्या. बेढब नव्हत्या, पण त्या नग्नतेमागे हीन गलिच्छ व्यापारी वृत्ती होती. त्याचा मला तिटकारा आला; इतक्यात श्रीमंतानी खूण केली म्हणूनच असेल त्यातली एक बया माझ्याजवळ लगटून बसली. सराव असलेल्या माणसाने या गोष्टीचे स्वागतच केले असते. पण माझ्या अंगावर शाहरे आले. मी ताडकन् उठलो व खाली जाऊन मोटारीत बसलो.

माझ्या मागोमाग श्रीमंतही आले. त्यानी माझी वाटेल तशी कुचेष्टा केली. हिणवले, खिजवले. नाही नाही तो अर्थ काढला. मी रागावून म्हणालो,

" काय वाटेल ते म्हणा पण असल्या या भानगडीत आपल्याला पाडू नका "

वस्त्राने झाकलेले सौंदर्यच अधिक मोहक वाटते. ते कल्पनेला अधिक चालना देते. पण या स्त्रियांनी जिज्ञासेला एकदम मारून टाकल्यामुळे वासना नष्ट झाल्या व त्या ठिकाणी तिटकारा उत्पन्न झाला.

अनुक्रमणिका

## अगदी याउलट दुसरा अनुभव

स्कूल ऑफ् आर्टची वरच्या क्लासची विद्यार्थ्यांची पार्टी स्केचिंग टूर-साठी दिल्लीस निघाली होती. कुठल्यातरी एका स्टेशनावर गाडी थांबली. गाडी पकडण्याकरता लगबगीने एक स्त्री चालू लागली. मुसलमानी पेहेराव होता. तांबडया साटीनचा घळघळीत, घोटयाजवळ अगदी चिंचोळा पायजमा, त्याला जरीची किनारी. वर हिरवंगार मखमली पोलकं. त्यावर जरीची वेलपत्ती. डोक्यावरून झिरझिरीत पांढरी मलमल. त्यावर जरीचे ठिपके. पांढऱ्या ढगातून पौर्णिमेच्या चंद्राने डोकवावे त्याप्रमाणे त्या ओढणीतून तो चेहरा डोकावला, क्षणभरच ! पण वीज चमकून जावी आणि जिवाला हादरा बसावा, त्याप्रमाणे झाले, अंग थरारलं, हीन वासना मरून गेल्या. त्यात गुलाब फुलांची मोहिनी नव्हती. त्यात सौदामिनीची धमक आणि प्रखरता होती. त्या दिव्य आणि प्रखर तेजापुढे मी दरिद्र्यासारखा आॅ वासून पहातच राहिलो.

एकच क्षण ! पण साऱ्या आयुष्यभर आठवावा ! पन्नास वर्षानंतर आजही आठवतो. " ते वारे आले गेले ! जन्माचे सार्थक झाले " गंगालहरींवर प्रकाशाची चमक पळभर स्थिरावून नाहीशी व्हावी तसे हे दिव्य सौंदर्य कुणीकडे आणि ती हिडीस अश्लील नग्नता कुणीकडे ! !

लँड्स्केप पेंटिंगचे मला वेडच लागले होते—

हजारो स्केचीस काढली. केवळ पंचगंगा घाटाचीच शेकडो. वॉटर कलर बॉक्स व सामान न्यायला सोईचे असल्यामुळे सर्व देखावे वाटर कलर मध्येच करीत असे. जागा चांगली असो स्वच्छ असो, घाण असो काटेरी असो, उकिरडया-वर स्टूल उघडून बसलो आहे. पन्हाळयाला काही दिवस जात असे. झुणका भाकरी बांधून पाण्याचे कॅरिअर गळयात अडकवून भाडयाच्या बस्‌ने अधिमधी उतरायचे व दिवसभर रानात भटकून स्केचीस काढता येतील तितकी काढायची व मग वाटेत गाडीची वाट पहात उभं राह्यचे व रात्री घरी परतायचे. श्रम कसले ते वाटायचे नाहीत.

## निसर्गाची समाधी

भल्या पाहाट उठून रंकाळयावर वाशीनाक्याजवळील चिंचेच्या झाडा-खाली पेटी उघडून बसलो. थंडी होती. अंगाला गुदगुल्या करणारी गोड थंडी होती ती. थोडं धुकंही होतं. पण समोरचा देखावा दृष्टिआड करण्याइतकं नव्हतं. गाण्यात लय लागावी, सुरातला खरखरीतपणा नाहीसा व्हावा, त्या-प्रमाणे त्या धुक्यानं झाडांचा डोंगरांचा दगडांचा खरखरीतपणा, त्याचे काने·

कोपरे मारून फुलार निळचा रंगाचा सर्व सृष्टीवर नाजुक हात फिरविला होता. कुठे म्हणून रखरखीतपणा ठेवला नाही. बारिक बाष्प तुषार हवेत तरंगत होते.

रविवारचा दिवस. कोकणच्या लाकडांच्या गाडया बाजारात नेण्या-अगोदर तेथे झाडाखाली सोडल्या होत्या. त्यांची झोपेची झापड अद्याप निघाली नव्हती. गाडी जोडण्यापूर्वी अंगात हुशारी व ऊब यावी म्हणून बैलापुढचा पाचोळा पेटवून आयाबाया आणि गाडीवान शेकोटीभोवती रिंगण घालून बसले. त्यातल्या एकाने दुसऱ्याला सुचविले 'अरे तुक्याचा एखादा अभंग म्हण रे.' गोड प्रेमळ भक्तिभावाने त्याने गळा काढला. इतरांनी त्यात हळू हळू सूर मिळविले. माझं हृदय भरून आलं. समोरचा चंद्रमा सूर्य-नारायणाची पाउले पाहताच आपलं काम संपलं असं समजून दूरवरच्या टेक-डीखाली जाऊ लागला. पण जलाशयाने त्याला हृदयाशी कवटाळून धरलं होतं. तो देखावा म्हणजे एक मूर्तिमंत काव्य होतं. मी पेटी मांडीवर ठेवून दिली आणि एका अपरिमित अशा आनंदाने अश्रू गाळू लागलो. हे अद्वितीय काव्य कागदावर आणायला मी असमर्थ होतो. या अवर्णनीय आनंदाने माझे डोळे मिटले व गोड अशी मला समाधी लागली. मीही निसर्गात एकरूप झालो.

## बंदिवासातही निसर्ग-सौंदर्याने सुखविले

पन्हाळगडावर आम्हाला तुरुंगात ठेवले होते. येथे आम्हाला परक्या माण-साचे वारेही लागू देत नसत. आम्ही ज्या ठिकाणी काम करीत असू त्या आस-पास चार पाच फर्लांगावर कोणा माणसाला फिरकू देत नसत. कामावर जाताना गुराखी दिसला तरी पोलीस पुढे जाऊन त्याला हाकलून देई.

पण मला ज्या सहवासापासून आनंद मिळत होता तो सहवास मला पोलिसाच्या डोळयादेखत भोगता आला. मी कैदी होतो पण चित्रकार होतो. हृदय जवळ होतं. डोळे उघडे होते. ते मिटण्याची सक्ती पोलीस करू शकले नाहीत. कुंचला हातात नसला तरी हृदयात सभोवतालच्या सृष्टीचे पडसाद उठत होते. लांब क्षितिजापर्यंत एकामागे एक गेलेला व अखेर नीलाकाशात जाऊन मिसळलेल्या पर्वतश्रेणी. पृष्ठभागावर चाललेला सावल्यांचा लपंडाव हिरकणीच्या कमरपट्टयाप्रमाणे अधून मधून चमकणाऱ्या गंगेचा प्रवाह, शेतात सोडलेली खिलारे व गुराख्यांच्या पाव्याचा येणारा आवाज. भरभर अंगाला चाटून जाणारा आरोग्यदायक शीतल वारा; दरी खोऱ्यात सापडलेल्या जणू शत्रूवर अचानकपणे मारा करणाऱ्या पावसाच्या सरी, अशा मिनिटामिनिटानी बदलणाऱ्या दृश्यानी

बंदीवासी जिण्याचा केव्हाच विसर पडे. सक्तमजूरी या देखाव्याने व श्रमाने देहाला पोषकच वाटे.

एका शिक्षेतून सुटलो पण पुनः १९४२ चलेजाव चळवळीत पन्हाळ्यावरच स्थानबद्ध करून ठेवले. बाहेर कामावर नेत नसत. बेड्या नव्हत्या. पण बाहेरचा संपर्क नव्हता. एका जुनाट वाड्यात आम्हाला डांबून ठेवलं होतं, लिहायला वाचायला मोकळीक होती.

माझ्या बसल्याजागेवरून— मला एक झाड दिसत असे. समोर भिंतीच असल्यामुळे वाऱ्याने डुलणाऱ्या पानावर सहजीच माझी नजर ठरत असे. कां कोण जाणे त्याच झाडाच्या पानांचा आवाज नेहमी विशेष ऐकू येई. रात्री इतर स्थानबद्धांच्या बरोबर त्या वाड्याच्या सोप्यात झोपलो होतो. त्या दिवशी खूप सोसाट्याचा वारा सुरू झाला. पांघरुणही विस्कटले ! समोर दिसणाऱ्या त्या पिंपरीच्या झाडाचा तर मला भयंकर राग आला. त्याची पाने इतका आवाज करू लागली की मला झोप येणे अशक्य झाले. पानाची फडफड सारखी चालू होती.

थकून थकून अखेर मला झोप लागली. पहाटे सहजीच झाडाकडे दृष्टि गेली. तो काय आश्चर्याची गोष्ट ! ज्यानी मला रात्रभर झोप पडू दिली नाही ती सर्व पाने झाडावरून गळून पडली होती. एकही पान शिल्लक नव्हते. झाडाचा बुंधा आणि बारिक सारिख ढाप्या. पालवीचा आक्रोश बंद पडला होता.

या दृश्याने त्या झाडावरचा राग कमी झाला. त्याची कीव आली मला. सुंदर इमारत जळून नुसते खांब तेवढे शिल्लक रहावेत तसे दिसत होते. त्याचे सर्व ऐश्वर्य लयाला गेले होते. हालचाल बंद पडली होती. जीव तरी होता की नाही कोण जाणे. जणू प्रेतांचा सांगाडा ! !

रात्री कसला आवाज झाला नाही. कसला त्रास झाला नाही. त्यामुळे मनाला मात्र समाधान झाले नाही. स्मशानवत् शांतता ! भरलेल्या बाजारातील गोंगाट कमी होऊन शुकशुकाट व्हावा तसे.

दुसरा दिवस उजाडला ! आज त्याहूनही आश्चर्याचे पण आल्हाददायक दृष्य दिसले. ते आश्चर्याचे, आनंदाचे व कुतूहलाचे होते. माझ्या चेहऱ्यावर आपोआपच हास्य उमटले.

पाळण्यात बालजिवाच्या गोंडस कोमल लाल तळव्याच्या पायाच्या चाळ्याने अंतःकरणाला गुदगुल्या व्हाव्यात ना तसे झाले मला. जणु काय गोजिर-

वाणी मुले हसऱ्या हावभावानी मला बोलावीत आहेत. मुलांच्या इवल्याशा हाताप्रमाणे ती पण लाल दिसत होती.

तिसऱ्या दिवशी झाड कोवळ्या पानानी फुलून गेले. त्यांचे ते लाल नाजुक ओठ बोबडे बोल बोलू लागले. मला मोह आवरला नाही. तेथूनच मी त्या प्रत्येकांची पटापट चुंबने घेऊ लागलो. स्पर्शाशिवायही आनंद भोगता येतो. सर्वत्र हास्यध्वनि उमटला, सर्व झाड जड जवाहिरांनी भरून गेले. बारशाचा थाटमाट चालू झाला. पक्षिगणानी सुस्वर सनया सुरू केल्या. आया-बायांचे भरजरी शालू चमकू लागले. सर्वत्र आनंदी आनंद !

गळलेल्या पानांचे दुःख विसरले गेले. तेथे नवी पालवी फुटली होती– गेल्या पिढीच्या जागी नवी पिढी आली होती. जुनी खोडे गेली होती. नव्या जुन्यांच्या झगड्यात जुने नाहीसे होणारच.

माणूस मर्त्य असला तरी मानव वंश अमरच नाही कां ? तो कुठे नाश पावतो ! एक गेला त्याच्या ठिकाणी दुसरा येतो. एक पिढी गेली दुसरी पिढी येते. तिचे राहिलेले काम करून पुढे जाते. आम्ही पण हेच करतो.

जीवनप्रवाह सारखा पुढे जात आहे. मध्ये खडक उभे राहतात. दऱ्या येतात, पण तो सर्व विरोध बाजूस सारून तो पुढे जात आहे. प्रवाह कुठे खडक फोडतो, कुठे वळणे घेतो. प्रसंगी कड्यावरून उडी घेतो पण तो थांबत नाही.

* * * *

महाराष्ट्र प्रांतिकच्या आदेशावरून काँग्रेसचे उमेदवार निवडून आणण्या-करता माझा दौरा आखला होता. त्या त्या तालुक्याचे काँग्रेसपुढाऱ्यांनी आखणी केली होती.

या दौऱ्यात मोठा लाभ मला झाला तो म्हणजे निसर्गसौंदर्य मनमुराद लुटण्याचा. शिरोडा, मालवण, चिपळूण हा भाग मला फार आवडला. एकेठिकाणी तर मी इतका मंत्रमुग्ध झालो की ते ठिकाण सोडून मला पुढे जाववेना. मी ड्रायव्हरला गाडी थांबवायला लावली. गाडीतून उतरलो व एका दगडावर बसलो, आणि सौंदर्याची भूक भागवून घेतली. या दोन ठिकाणी सौंद-र्याचे परस्पर विरोधी नमुने होते. पहिल्याला मी भीषण सौंदर्य म्हणीन. एकाने छातीत धडकी भरत होती तर दुसऱ्याने रोमांच लहरी उठत !

काही आठवणी आयुष्यात कायमच्या रहातात त्यापैकी या होत.

पाटण सोडून काही मैल गेल्यावर रस्त्याच्या बाजूला कोयनेचा प्रवाह चालू होतो. तो सारखा दहा पंधरा मैल रस्त्याला समांतर असा चालू








लागतो. दुतर्फा हिरवी गार गर्द झाडी. खाली सापाप्रमाणे वळसा घालत पाठिमागे लागलेली कोयना. हेळवाक पर्यंत ही पाठशिवण चालते.

हेळवाकनंतर घाटमाथा सुरू होतो. कोयनेचे मोहक दृश्य नाहीसे होते. छातीत धडकी भरणारा देखावा लागतो. समुद्राच्या खवळलेल्या लाटाप्रमाणे एकाहून एक मोठे डोंगर राक्षसाप्रमाणे सर्वस्वाचा स्वाहा करण्याकरता जणु पुढे येऊ लागतात. एका बाजूस समंधाप्रमाणे अक्राळ विक्राळ, कडेलोट करण्यास उभा राहिलेला गगनभेदी उंच कडा तर त्याच खाली जबडा पसरून पाताळात गडप करणारी महामाया भयंकर खोल दरी, जबडा पसरून जणु गिळायला उठलेली पाहून अंगावर भीतीचा काटा उभा राहिला !

सराइत ड्रायव्हरला त्याचे काय ?

चिपळूण सोडून काही मैल गेल्यावर गाडी टेकडीवर येते. येथून स्वर्गीय सौंदर्य दिसू लागतं. टेकडीवरून खाली पाहिलं की मर्त्यलोकीचा संसर्ग सुटल्याचा भास होतो. पर्वतांचे गांभीर्य व रुक्षता खालच्या देखाव्याने नाहीशी केली होती. ते पर्वत जड आणि जीव हा भेद न करता पायथ्याशी असलेल्या सर्वांना पोटाशी धरून गोंजारत होते. त्यानी आपली फुलार शुभ्र शाल सर्वांवर टाकली होती. एखाद दुसरी होडी आपली तजेलदार पंखे पसरून अंतराळात वाहू लागली होती. पिताजीच्या या आधारामुळे निर्धास्त झालेली जनता आपआपल्या चिमुकल्या घरट्यातून अद्याप बाहेर पडू इच्छित नव्हती. उन्हाची तिरीप लागू नये म्हणून सूर्याआड धुक्याने शुभ्र लोकरी पडदा सोडून दिला होता. रामपाऱ्याची गोड झोप टाकून बाहेर पडण्याचा त्याना कंटाळा आला होता. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि जीवसृष्टी याचा हा गोड मिलाफ मन तल्लीन करणारा व कलावंताना वेड लावणारा होता. निसर्गाच्या या उदात्त प्रेमळ स्वरूपापुढे पर्वताची उत्तुंग शिखरे खालच्या जलाशयात नष्ट झाली होती. शरण आली होती. तो जलाशय त्याना प्रेमाने झोके देत होता. प्रेमाच्या जादूने सर्वात ऐक्यभाव व एकतानता निर्माण केली होती. त्या आनंदाच्या भरात जललहरी किनाऱ्यावर नाजुक साथ देत होत्या.

निसर्गाने झोप फेकून दिली. कोंबड्याने आरवून उठण्याचा इषारा दिला ! सौंदर्याने नवी दालने उघडू लागली. प्रत्येक क्षणाला त्याची नवलाई नटून सजून पुढे येई.

खाली पाण्याचे सपाटीबरोबर निरनिराळ्या आकाराचे रंगीबेरंगी गालिचे पसरून दिले होते. त्यावर मालकीच्या बांधाची किनारी टाकली होती.

अनुक्रमणिका

मध्येच एखादी झोपडी डोकं वर काढी. सोन्या–रुप्याची ताटे अधून मधून चमकत होती. एखादा स्वार्थी वडिलधारा वृक्ष ती दडपण्याचा प्रयत्न करी. पण अवखळ पानांच्या व नाचऱ्या फांद्यांच्या फटीतून त्यांची चमक बाहेर पडेलच. वाटेल त्या जागी बसावं आणि सौंदर्य मनमुराद भोगावं.

गाडी चालू झाली मी परपरतून पहात होतो.

मी ओळखी विसरतो, गावे विसरतो पण हा प्रसंग सदैव ताजाच आहे.

* * * *

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत सीमाभागाचा सेनानी म्हणून मी बेळगावात जाऊन सत्याग्रह केला. ४–१०–५८ ला कोर्टात नेलं. ता. १८ ला हिंडलगा जेलमध्ये ठेवलं. तेवढ्या दिवसात मला पोलिसाचा लोभ मिळाला. त्यांच्यातील हृदयही जाणता आलं. केवळ शिक्षणाने आत्मविकास होतो असे नाही. पोलीसाच्या पायाजवळ एक मोठा टोळ पडला होता. तो हलत नव्हता. तो दुखवला असावा. त्यानं फुलार हातानं तो उचलला व फुलझाडाच्या पानावर ठेवून दिला. मला फार कौतुक वाटलं त्याचं. मी त्याला विचारलं, " तुम्ही त्याला पानावर कां ठेवलं ? " तो म्हणाला 'त्याचा पाय दुखवला होता, आणखी कोणीतरी त्याला तुडवेल म्हणून वर ठेवला साहेब."

मी त्या पोलिसाजवळ गेलो. प्रेमाने पाठीवर हात टाकला व भरल्या हृदयानं म्हणालो "बाबा असंच प्रेमळ मन ठेव बरं' 'यावर तो म्हणाला 'हे काय शिकवावं लागतं, असतंच ते' पण कितीजणाजवळ असतं हे. आपल्या निर्मळ व प्रेमळ मनानं त्यानं खजिल केलं मला !

हिंडलग्याला स्वातंत्र्य वीर सावरकराना ज्या खोलीत ठेवलं होतं त्याच खोलीत राहण्याचा मान मला मिळाला. पण २७–११–५८ ला रात्री आम्हाला हिंडलगा सोडावा लागला. सहवासामुळे जागेवर, वार्डरवर, पोलिसावर आणि ऑफिसवरही एक प्रकारचा लोभ जडला होता. सतत समोर चवरीप्रमाणे ढळणारे तांबड्या गुच्छाचे झाडही आपले वाटू लागले होते. गेट बाहेर एखाद्या मस्त बादशहासारखा उभा असलेला वळ, भोवतालची सुंदर बाग, जेलरच्या भेटीस निघालो म्हणजे हातात रंगी बेरंगी फुलांचे गजरे घेऊन हंसत स्वागतासाठी उभी राहिलेली ती फुलझाडांची नाचरी फलटण या सर्वांना आता आपण मुकणार म्हणून अस्वस्थ झालो.

बेळगाव स्टेशनवर न नेता मोटर एकदम हुबळी स्टेशनवर नेली. गाडीत झोपेमुळे बसवेना म्हणून खाली फलंडलो. तो पोलीसानी आपला डगला अंथरायला एक व अंगावर टाकायला एक दिला– ८ वाजता हरिहरला उतरलो. त्यानी बस ठरवलीच होती. मराठी शब्द चुकूनही कानावर पडू

शकला नाही. कपडे निराळे शेंडी कपाळाला गंध खाली नुसता गुंडाळलेला ! हाटेलात चहा करीत नव्हे कॉफी व इडली.

शिमोगा सुटल्यानंतर मी माझ्या प्रांतात आलो.

माझ्या प्रांतात म्हणजे सृष्टिसुंदरीच्या प्रांतात.

घनदाट वनश्री ! उत्तुंग वृक्ष ! एकाहून एक उंच ! आकाशाला भेटण्यासाठी जो तो वर डोके काढत आहे. बाहू पसरून कवटाळू इच्छितो आहे ! आकाशाने निळ्या शालीचं सर्वांवर पांघरुण टाकलं आहे. वडिलधाऱ्या वृक्षांनी वेलींना हृदयाशी घट्ट आवळून धरलं आहे. साग व वेळू वर डोकं काढण्याकरता एकमेकाला बाजूस सारत होते. आम्रवृक्ष त्याना आपल्या विस्ताराने आपली जागा राखून ठेवत होता. लहान सहान झाडे झुडपे कोणाला तरी बिलगून राहिली होती. रस्त्याच्या कडेला इन्फंट्री सारखी वृक्षाची रांग तिष्ठत उभी होती. फट क्वचितच पडे. ३०-४० मैल सारखं जंगल ! प्रचंड वृक्षांची तटबंदी ! जंगलात जो कोणी शिरेल त्याला बाहेर पडायला वाट सापडणार नाही. माणूस चक्रव्यूहातच सापडेल. चारी दिशा आणि वरचीही बंद ! सर्व प्रकारची श्वापदे शिकाऱ्याला तेथे मिळतील. त्यांचा एकमेकांचा संहार तेथे चाललेलाच असणार ! येथे निसर्ग रहस्यमय आहे. जणु ज्ञानाचा ग्रंथ येथे कडी कुलपात राखून ठेवला आहे.

झाडी ! झाडी ! झाडी ! दुसरं काऽही नाही ! आकाशाची कवाडे बंद ! क्षितिज बंद ! जंगलातून जाणारा रस्ता मात्र माणसाचे निसर्गावरचे प्रभुत्व सिद्ध करीत होता.

पुढे घाटमाथ्यावरून खाली अरुंद रस्त्यातून जाण्याकरता मोठी बस बदलावी लागली. त्याच कंपनीने आपल्या छोट्या गाड्या घाटापुरत्या ठेवल्या होत्या. ओगंब्याला गाडी बदलावी लागली. वळणे ड्रायव्हरच्या कौशल्याची पारख करणारी होती. गाडी सावरली जावी म्हणून उतरण संपेपर्यंत कठडे बांधले होते.

उतरण संपली. निसर्गाने आतापर्यंत झाकलेली सर्व मूठ खुली केली. सारे रहस्य उकलून आम्हासमोर ठेवले. विराट स्वरूप दर्शन होतं ते ! निसर्गाची भयानकता, भव्यता, उदात्तता, आणि रमणीयता याचा संगम होता तेथे.

आम्ही विमानातून जणु खालच्या सृष्टीकडे पहात होतो. प्रचंड वृक्ष लहान मुलाप्रमाणे रांगत होते. तलावानी डबक्याचं स्वरूप धारण केलं होतं. नद नद्या झऱ्यासारख्या दिसत होत्या. घरे चिमण्याची घरटी बनली होती. दृष्टी क्षितिजापर्यंत पोचून अखेर विश्वात एकरूप होत होती.

'विश्वचि माझे घर' ही भावना जागृत करीत होती. पर्वतांच्या रांगा लाटेप्रमाणे वहात आकाशात मिसळल्या होत्या. मध्येच कुठेतरी जलाशय चमकून त्यात आत्मा ओतीत होता.

येथे बडे बडे डिक्टेटर कीटकासारखे वाटू लागले. सर्वांना आत्मसात करणारी निसर्गाची प्रभावी शक्ती ती! ज्या सौंदर्याने हृदय मुदित होतं ते सौंदर्य. आपण गानसौंदर्यही म्हणतोच.

मला गाण्याची काही माहिती नाही. त्याच्या चालीचं ज्ञान मला नाही. तरी मी माणूस आहे. मी गानमुग्ध आहे. बायकोच्या आजारात मी 'पिया बिन' हा रेकार्ड पुनः पुनः लावत असे. तो ऐकण्याचा मला कंटाळा येणार नाही. ४०-५० वर्षे होऊन गेली पण बालगंधर्वांची गाणी अद्याप ऐकू येतात. गणपतराव जोश्यांची अंग थरारून सोडणारी भाषणे अद्याप अंगावर काटा उभा करतात. मी बैठकीला कधी जाऊन बसलो नाही. पण रहिमतखां, ओंकार व हिराबाई बडोदेकर यांचे रेकार्डस ऐकण्याचा मला कंटाळा येत नाही.

शाहू महाराजांच्या मुंबईतील पन्हाळा लॉज मध्ये अल्लादियाखां व मी एकाच वेळी रहात होतो. पण आश्चर्याची गोष्ट खासाहेबाची ताण त्या दोन-वर्षांत माझ्या कानावर कधी पडली नाही. पण सहवासातून आपलेपणा व प्रेम निर्माण झाले होते.

वाड्यावरून एक मुलगी आपल्या आंधळ्या बापाला बरोबर घेऊन भीक मागत जात असे. पण तिची ताण इतकी गोड असे की मी ट्रॅम गाठण्यासाठी निघालो असलो तरी ती लकेर कानावर पडली की माझा हात खिशात जाई व मी असतील ते सर्व पैसे तिच्या थाळीत टाकून परत बंगल्यात ट्रॅमसाठी पैसा घेण्याकरता येत असे.

ती गाणं म्हणत येत होती. तोच मी खानसाहेबांचा हात पकडला व विचारलं.

'खां साब हिची तान कानावर पडली की माझं हृदय छेडतं अन् हात खिशात जातो व मी सर्व पैसे तिच्या थाळीत टाकतो असं कां होतं मला'

खा साब म्हणाले,

बागल साब याचं कारण ती ताण आम्ही जन्म घातला आवाज कमावण्यात, पण ही ताण आम्हाला येत नाही. ही निसर्गाची देणगी आहे.

◆ ◆ ◆ ◆



अनुक्रमणिका

श्री. शरद पाटील

# ब्रह्मन् : ८ : ( उत्तरार्ध )

---

मातृदेवतांच्या या धर्मपतींना 'कर्ता' असेही म्हणत. नदीदेवता गंगा व राजर्षि महाभिष यांनी एकमेकांबद्दलचे आकर्षण ब्रह्मदेवासमोर प्रकट करायची धृष्टता दाखवल्याबद्दल त्याने त्यांना मर्त्य मानव बनून त्या आकर्षणाची परिपूर्तता करायचा शाप दिला. ब्रह्मलोकातून परतत असलेल्या या उद्विग्न देवीला आर्यपूर्व पंचजनांच्या ब्रह्मन् ज्ञातीचे अष्टवसु भेटले ( ५.१८२.१२; १८३.७; १८५.५ ). त्यांनाही वसिष्ठाकडून मर्त्य बनायचा शाप मिळालेला होता. त्यांनी गंगेला मानवलोकात त्यांची माता व्हायची विनंती केली. तिने त्यांना विचारले ( १.९६.१७ ) –

"मर्त्येषु पुरुषश्रेष्ठः को वः कर्ता भविष्यति।"

[ "मर्त्यांमध्ये कोणता पुरुषश्रेष्ठ तुमच्यासाठी माझा कर्ता होईल ?" ]

ब्रह्मवादिन् वसु उत्तरले–

"प्रतीपस्य सुतो राजा शान्तनुर् लोक–विश्रुतः।
भविता मानुषे लोके स नः कर्ता भविष्यति॥

[ "प्रतीपाचा लोकविख्यात पुत्र राजा शांतनु आमच्यासाठी मनुष्यलोकात तुझा कर्ता होईल." ]

परंतु तिच्या स्वभावानुसार, वा खरे म्हणजे तिच्या सामाजिक भूमिकेनुसार, या कामुक देवीने खुद्द राजा प्रतीपाचेच प्रणयाराधन करायचा प्रयत्न केला (१.९७.१–७) ! उगाच नाही दंडिन्ने त्याच्या दशकुमारचरितात (२.३) गणपतीने गंगेला 'स्वर्गलोकाप्रमाणे मर्त्यलोकातही अनेकांकडून भोगली जाशील,' असा एके काळी शाप दिल्याची लोकपरंपरा नमूद केलेली ( "यथा इह बहु–भोग्या तथा प्राप्य अपि मानुष्यकम् अनेक–साधारणी भव।" ).

कर्त्याचा अर्थ येथे केवळ वसूंचा 'पिता' असा होतो अशी हरकत घेतली जाऊ शकते. परंतु व्याकरण व वाक्यरचना याही दृष्टीनी तसा अर्थ होऊ शकत नाही. योजले गेलेले 'वः' (तुमच्यासाठी) 'नः' (आमच्यासाठी) हे दोन्ही शब्द अनुक्रमे युष्मद् व अस्मद् या सर्वनामांची चतुर्थीतली रूपे आहेत, आणि गंगेने वसूंना विचारलेला प्रश्न मानवलोकात सुयोग्य सहचर शोधायच्या चिंतेतून उद्भवलेला होता.

येथे एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे ती ही की गंगा निरपवादपणे राजर्षींवरच आसक्त होत असे. महाभिष हा इक्ष्वाकूंचा राजर्षि होता (१. ९६.५). प्रतीप कुरूंचा राजर्षि होता (१.९७.३), आणि त्याचा मुलगा शांतनु, ज्याला गंगेने तिचा नियतकालिक धर्मपती म्हणून निवडले, तो खुद्द राजर्षि महाभिषाचाच अवतार होता. गंगा शांतनूची महिषी या शर्तीवर झाली, की तिचे त्याने कोणत्याही बाबतीत निवारण वा अप्रिय करू नये, आणि शब्दाने वा कृतीने तिला यत्किंचितही विरोध केल्यास तत्क्षणीच ती त्याला सोडून जाईल (१. ९८. ३–४). ती त्याच्यापाशी आठ वर्षे राहिली. दर वर्षी एका वसूला जन्म देत व जन्मताच त्या अर्भकाला स्वतःच्या जलस्वरूपात बुडवीत. पण ती जेव्हा आठव्या वसूला– जो पुढे भीष्म वा भयंकर या नावाने प्रख्यात झाला– बुडवायला निघाली, तेव्हा मात्र शांतनूचा संयम सुटला व त्याने तिची निर्भर्त्सना केली. तिने मुलाला जिवंत ठेवले, पण शर्तभंग झाला म्हणून शांतनूचा त्याग केला. अगोदर दिग्दर्शित केल्याप्रमाणे या शर्तीला वा कराराला 'समय' म्हणत असत, आणि तोच शब्दप्रयोग करीत या मातृदेवतेने घोषणा केली (१. ९८. १७, २२) –

"जीर्णस् तु मम वासोऽयं यथा स समयः कृतः ॥"

[ "तू माझ्याशी केलेल्या समयानुसार तुझ्याबरोबरचा माझा वास आता जीर्ण झालेला आहे." ]

'वास' या शब्दावर येथे बहारीची कोटी आहे. त्याचे अर्थ वास्तव्य वा समागमकाल व वस्त्र असे होतात. धर्मपतीजवळ कोणतेही नियंत्रण न मानता ठराविक मुदतीपर्यंत (जिचे विवरण पुढे केले जाईल) व ठराविक शर्तीवर राहाणे हा या 'मातृकांचा' अलिखित कायदा (समय) होता. हिडिंबेने कुंतीला सांगितले, की ती ना चेटकीण (यातुधानी) आहे ना निशाचरी राक्षसी (रजनी–चरी), तर ती एका रक्षस्‌ची कन्या असून त्या देशाची राणी व सागांच्या वाडीची मातृदेवता आहे ("अस्मि राज्ञी साल-

कटङ्-कटी ॥ " १. १५४. ११ ). तिला एक मुलगा होईतो तिच्या समागमात राहायचा 'समय' करायचे भीमाने कबूल केले ( १. १५४. १९–२० ) –

" श्रुणु राक्षसि सत्येन समयं ते वदाम्य्– अहम् ॥
यावत् कालेन भवति पुत्रस्य उत्पादनं शुभे ।
तावत् कालं गमिष्यामि त्वया सह सुमध्यमे ॥ '

[ " राक्षसी, मी तुझ्याबरोबर सत्यपूर्वक करीत असलेला समय ऐक– शुभे, मुलाचे उत्पादन करायला तुला जेवढा काळ लागेल तेवढ्या काळापर्यंत, सुमध्यमे, मी तुझ्या समागमात राहीन." ]

कर्ता या शब्दाचा अर्थ मुळात राष्ट्रीचा नियतकालिक धर्मपती असा होई हे अगोदर उद्धृत केलेल्या कर्णाच्या जन्मकथेवरून स्पष्ट होते. कुंतीशी व्हायच्या दैवी संयोगात सूर्यदेव स्वतःला तिचा कर्ता म्हणतो ( ३. १०६ ११ )–

" आगतोऽस्मि वशं भद्रे तव मन्त्र–बलात् कृतः ।
किं करोमि वशो राज्ञि ब्रूहि कर्ता तद् अस्मि ते ॥ "

[ " भद्रे, तुझ्या मंत्रबलाने बांधला जाऊन मी आलो आहे. राणी, मी काय करावे ते सांग ! मी तुझा कर्ता असल्याने तुझा दास आहे." ]

दुर्वासस् या ब्रह्मन् आचार्याने कुंतीला ब्रह्मवादिनीची दीक्षा दिल्यानंतर तिला सीमंतिनी व्हायचा आशीर्वाद दिला ( २.३०५.१४ ). उद्योगपर्वात (९०-९१ ) कृष्ण तिला सीमंतिनी असे संबोधतो. म्हणून सीमंतिनीचा अर्थ केवळ स्त्री असा होणे शक्य नाही, तर स्त्रीसत्ताक गणाच्या राष्ट्रीची ती सन्माननीय पदवी असली पाहिजे.

गृह्यसूत्रांमध्ये ' सीमंतोन्नयन ' नावाच्या एका वैशिष्ट्यपूर्ण विधीचे वर्णन विस्ताराने आलेले आहे. त्याचा शब्दशः अर्थ आहे '(स्त्रीचे) केस मागे विंचरणे' [६३] मानव गृह्यसूत्राच्या ( १.१२.२ ) मते तो विवाहविधीचा एक भाग आहे. [६४] अथर्ववेदीय विवाहसूक्ताची १४.१.५५ ही ऋचा वधूचे ( सूर्येचे ) केस मागे विंचरीत म्हणायची असते. इतर गृह्यसूत्रे सांगतात की तो स्वतंत्र संस्कार असून तो स्त्रीच्या गर्भारपणात करायचा असतो. गर्भारपणाच्या बरोबर कोणत्या महिन्यात तो करावा याबद्दलही मतभेद आहेत–

'...... काठक गृह्यसूत्रानुसार हा संस्कार ३ऱ्या महिन्यात करायचा असतो, मानव गृह्यसूत्रानुसार ३ऱ्या, ६ व्या वा ८ व्या महिन्यात; आश्वलायन, आपस्तंब, हिरण्यकेशी ( २.१ ) गृह्यसूत्रानुसार ४ थ्या महिन्यात, गोभिल.

गृह्यसूत्रानुसार (२.७.२) ४ थ्या वा ६ व्या महिन्यात, खादिर गृह्यसूत्रानुसार ४ थ्या, ६ व्या वा ८ व्या महिन्यात; पारस्कर, याज्ञवल्क्य ( १.११ ) विष्णु-धर्मसूत्र ( २७.३ ), शंख यांच्या मते ६ व्या वा ८ व्या महिन्यात; शांखायन गृह्यसूत्रानुसार (१.२१.१) ७ व्या महिन्यात, वैखानस व वेद–व्यास (१.१८) यांच्या मते ८ व्या महिन्यात. स्मृतिचंद्रिकेने ( १, पृ. १७ ) उद्धृत केल्या-प्रमाणे शंख म्हणतो, की गर्भ पोटात फिरायला लागल्यापासून प्रसूतीपर्यंत केव्हाही हा संस्कार करावा ... '[६५]

या संस्काराचे यथार्थ स्वरूप त्याच्या मीमांसेवरून नाही, तर प्रत्यक्ष विधीवरूनच समजू शकेल–

' ... हा संस्कार मुख्यत: सामाजिक व उत्सवी स्वरूपाचा असून त्याचा हेतु गर्भवती स्त्रीला प्रसन्न ठेवणे हा आहे. संस्कारप्रकाश ( पाने १७२–१७३ ) आश्वलायनाचे काही श्लोक उद्धृत करून सांगतो की, या संस्काराद्वारे गर्भाचा नाश करायला टपलेल्या काही राक्षसांना पळवून लावता येते; पतीने पीस, कच्च्या फळांचा घड व दर्भ ( गवत ) यांनी ( पत्नीचे ) केस ( विंचरून ) मागे वळवणे, तिच्या गळ्यात हार घालणे, तिला मूग व तूप कालवलेला भात खायला देणे आणि वीणावादकांना गायन ( वादन ) करायला सांगणे, हे या ( संस्काराचे ) महोत्सवी स्वरूप दिग्दर्शित करतात ... '[६६]

२.३२ या ऋग्वेदीय सूक्ताचा यावेळी सस्वर पाठ केला जात असे. त्याची पहिली ऋचा द्यावा–पृथिवी यांना आवाहन करते, दुसरी व तिसरी इंद्र व त्वष्ट्र यांना, आणि अखेरच्या पाच राका, सिनीवाली, गुंगू, सरस्वती, इंद्राणी व वरुणानी या देवतांना ४, ६ व ७ या ऋचा या महोत्सवाच्या स्वरूपावर व व्यापकतेवर प्रकाश टाकतात–

स्तवनीय राकेचे मी दिव्य स्तोत्रांनी आवाहन करतो. ती सुभगा आमचे ( स्तवन ) ऐको व प्रबुद्ध होवो. अतूट सुईने ती प्रजननकर्म शिवो; आणि शेकडो पटींनी स्तवनीय असा वीरपुत्र ती आम्हाला प्रदान करो.

देवांची भगिनी असलेल्या पुष्ट नितंबिनी सिनीवाली, तुला अर्पण केलेल्या या हव्यान्नाचा उपभोग घे, आणि देवी, आम्हाला संतान प्रदान कर.

पुष्ट बाहू, लांबसडक बोटे, सुपीक कूस असलेल्या बहुपुत्रका गणराज्ञी सिनीवालीला हव्यान्न अर्पण करा–

राका ही कृष्ण पक्षाची प्रतिपदा आहे, व सिनीवाली ही कृष्णपक्षाची चतुर्दशी आहे. सिनम्‌चा अर्थ अन्न असाही होतो; म्हणून सिनीवाली ही इळे-

सारखीच अन्नदेवता आहे.[६७] तिला देवभगिनी ( देवानां स्वसा ) व देवगणाची राज्ञी ( विश्-पत्नी ) असे म्हटले आहे हे लक्षात घेण्यासारखे आहे. स्वसाची निरुक्तप्रणीत ( ११.३२ ) व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे– 'सु + असा म्हणजे जी स्वजनात ( स्वेषु ) बसते ( सीदति )...' याचा अर्थ साहजिकच असा होतो की ती तिच्या पतीच्या जनात राहायला जात नसे.

यावरून हे स्पष्ट होते की सीमंतोन्नयन हा अन्न व प्रजा या प्रीत्यर्थचा गणोत्सव होता पण गणसमाजाचा प्रत्येक प्रयास याच उद्दिष्टांकरता होता व म्हणून या सामान्यीकरणाने भागणार नाही. राका अतूट सुईने एक वस्त्र शिवताना दाखवलेली आहे. या उत्सवात वीणागाथिन् खालील गाथा गात असत–

" यौगन्धरिर् एव नो राजा इति साल्वीर् अवादिषुः।
विवृत्त-चक्रा आसीनास् तीरेण यमुने तव ॥ "

[ यौगंधरि आमचा राजा आहे "– असे, यमुने, तुझ्या तीरावर बसून चरखा फिरवीत साल्व गणाच्या स्त्रिया गातात. ' ][६८]

साल्व हा बाल्हीक प्रदेशातला एक गणसंघ होता व त्याची सीमा यमुनेला भिडलेली होती. हा देश प्राचीन काळात लोकर, ताग व कापूस यांच्या कापडाबद्दल प्रसिद्ध होता.[६९] सूतकताई व कापड विणाई हे शेतीप्रमाणेच स्त्रीचे शोध होते व प्राचीन काळात ते पूर्णपणे स्त्रियांच्या हातात होते–

"' मणिपूरच्या आदीवासी जमातींमध्ये कापडाचे दहा वेगवेगळे प्रकार काही विशिष्ट खेड्यामध्येच तयार होतात. 'हा उद्योग,' श्री. टी. सी. हडसन् म्हणतात, 'केवळ स्त्रियाच करतात, आणि ही सहा खेडी, ज्या खेड्यात हा उद्योग चालत नाही, तेथे लग्न करायला आपल्या मुलींना मनाई करतात.'[७०]

वैदिक पुराव्यावरूनही हे सिद्ध होते. १०-७-४२ ही अथर्ववेदीय ऋचा गाते–

तन्त्रम् एके युवती विरूपे अभ्याक्रमं वयतः षण्मयूखम् ।
प्र अन्या तन्तूस् तिरते धत्ते अन्या न अपवृञ्जाते न गमातो अन्तम् ॥

[ ४२ 'दोन भिन्नरूपधारिणी युवतीस्वरूपी नियती सहा खुंट्यांच्या मागावर पुनःपुन्हा वस्त्र विणतात. त्यापैकी एक धागे काढते आणि दुसरी जोडते. त्यांचे हे कार्य अविरत आणि अविश्रांतपणे चालू असते.' ][७१]

अथर्ववेदीय विवाहसूक्त ( १४-१-४५ ) विणकामाचा दैवी व्यवसायात आणि विणल्या जाणाऱ्या वस्त्राचा दैव व जीवनाच्या पटात कायाकल्प करते—

या अकृन्तन् अवयन् याश् च तत्निरे या देवीर् अन्तो अभितोऽददन्त ।
तास्त्वा जरसे सं व्ययन्त्व् आयुष्मती इदं परिधत्स्व वासः ॥

[ ४५ हे नववधू, तुझ्या वस्त्राचे सूत कातणाऱ्या, विणणाऱ्या, तसेच त्यांच्या गाठी मारणाऱ्या स्त्रिया वृद्धापकाळापर्यंत तुझी वस्त्रे विणीत राहोत, आणि तुझ्या वृद्धापकाळापर्यंत तू ती नूतन वस्त्रे परिधान कर. ] [७२]

महाभारत ( १.३.१६३,१६६ ) या दोन युवतींची नावे धाता व विधाता अशी देते आणि त्या रात्र व दिवसाच्या अनुक्रमे काळ्या व पांढऱ्या धाग्यांनी काळरूपी अनंत वस्त्र विणीत असल्याचे दाखवते. धाता व विधाता या जगन्माता आहेत ज्या अनंत काळाचे वस्त्र विणतात एवढेच नाही, तर व्यक्तींचे दैवही त्यात विणतात. ग्रीक मॉइराई व्यक्तींच्या दैवाचे धागे कातीत—

' ... त्यांची ( मॉइराईंची ) नावे आहेत क्लोथो, ॲत्रॉपॉस व लॅकेसिस्, क्लोथो ही मूर्तिमंत कताई असून ती तिघींमध्ये सनातनतम आहे, होमर या तिघींचा सामूहिकपणे क्लोथ्स् असा निर्देश करतो, ... ' [७३]

ब्रह्मलोकात प्रविष्ट झालेल्या मृतात्म्याच्या प्रवासाचे वर्णन करीत असता कौषीतकि उपनिषद् म्हणते—

' ... मानसी व चाक्षुषी या दोन्ही फुले घेऊन हे लोक गुंफतात. आणि ( या ब्रह्मलोकात ) अप्सरा, अंबा, अंबायवी व अंब या नद्या ( याही असतात )... ' [७४]

येथे आपल्याला काळाचे व व्यक्तिगत प्राक्तनाचे वस्त्र विणणाऱ्या जगताच्या व गणाच्या अंबात्रयी आढळतात. मातृदेवता राकाला आपण जे वस्त्र विणताना पाहिले ते हेच नियतीचे वस्त्र होते. पण ही कताई व विणाई कोणाकरता व कशाकरता चालत असे ? —

' ... गोभिल, खादिर, भारद्वाज, पारस्कर व शांखायन ही (गृह्यसूत्रे) भात शिजवून त्यात तूप वा तीळ टाकायला सांगतात, आणि पहिली तीन म्हणतात की ( गर्भवती ) स्त्रीला या तुपाकडे व भाताकडे बघायला सांगावे व विचारावे, ' तुला काय दिसते. ' त्यावर तिने उत्तर द्यावे, ' मला प्रजा दिसते ' ( भारद्वाजप्रणीत उत्तर आहे ' पुत्र व पशु ' ). ( पत्नीच्या ) केसांचा भांग, पाडण्यासाठी पतीने कच्च्या फळांचा घड ( गोभिल, पारस्कर व शांखायन उंबराच्या फळाची शिफारस करतात ), तीन

अनुक्रमणिका

पांढरे ठिपके असलेले साळूचे पीस व कुश गवताच्या तीन जुडद्या वापरण्याबद्दल बहुतेक गृह्यसूत्रे सहमत आहेत. पारस्कर व गोभिल यात वीरतर गवताची काडी व भरलेली चाती यांच्या वापराची भर घालतात. आश्वलायन तीन वेळा भांग पाडायची शिफारस करते, गोभिल सहा वेळा, तर खादिर ( २.२.२५ ) ते केवळ एकच वेळा करण्याबद्दल निक्षून सांगते. शांखायन सांगते की पीळ दिलेल्या तीन धाग्यांच्या दोरीला कच्ची फळे बांधावी व ती तिच्या गळचात माळेसारखी घालावी. पारस्करची सूचना तशीच दिसते. आपस्तंब असेही सांगते की पतीने जवाचे दाणे व कोंब याची माळ तिच्या डोक्याभोवती बांधावी ( १४.७ ) ...'[७४]

सीमंतिनीचे काळे केस साळूचे पीस, इ० नी मागे वळवून कर्ता तिच्या यशस्वी व सफल गर्भधारणेचा अभिनय करतो. ही कृती काळी जमीन नागरण्याच्या व पेरण्याच्या श्रमक्रियेची नक्कल आहे, आणि कच्च्या फळांचा घड हा अपरिपक्व पिकाचे प्रतीक आहे. अपरिपक्व पीक म्हणजे सीमंतिनी वागवीत असलेला क्षत्र गर्भ होय. दैवी कताई व विणाईचे गाथेने दाखवलेले साल्व स्त्रियांनी आणि संबंधित सीमंतिनीच्या गणाच्या स्त्रियांनी केलेले अनुकरण राकेला गर्भासाठी शुभ दैव विणायला भाग पाडावे म्हणून केलेला मायाविधी आहे. राष्ट्र गणभूमीनेही पिकाची गर्भधारणा केलेली आहे, आणि गणाला भरघोस हंगामाचा लाभ व्हावा यासाठी कर्ता गणमातेला अन्नपूर्णा सिनीवालीच्या रूपात सजवीत आहे.

केरळच्या मातृवंशक[७५] समाजात करणवेर वा कर्ता थरवाड शेतीचा कारभारी असून तो थरवाडचा ज्येष्ठतम मामा असे हे अगोदर दाखवलेलेच आहे. मातृवंशक खासींमध्ये तशीच प्रथा होती–

"...कुलाच्या जमिनींचा कारभारी वनी ( मुख्य कुटुंबातल्या वा कुलाच्या शाखेतल्या कनिष्ठतम कन्येचा मामा ) असतो. त्याचे "क ईंग खड्डुह्" म्हणजे शेवटचे घर– त्याला क ईंग सेंग असेही म्हणतात– कुलाचे सर्व धर्मविधी करायचे स्थान असते. कुलाच्या सदस्यांनी खेटलेल्या कोणत्याही कुलक्षेत्राच्या पिकात हिस्सेदार व्हायचा कुलाच्या सर्व सदस्यांना अधिकार असतो.....'[७६]

अशाप्रकारे आर्थिक उत्पादनाच्या पायाभूत क्षेत्रात मल्याळी व खासी या दोन्ही मातृवंशक समाजांमध्ये मामा हा कर्ता असे, तर पूर्णपणे स्त्रीसत्ताक समाजांमध्ये नियतकालिक धर्मपती हा कर्ता असे. स्त्रीसत्ताक समाज व मातृवंशक समाज यातला हा एक मुख्य भेद होता. मातृवंशक समाजात मालमत्तेची

मालकी व वंशक्रम जरी संपूर्णपणे स्त्रीप्रणीत होते, तरी आर्थिक व राजकीय अधिकाराचा व्यावहारिक वापर पुरुषप्रणीत झालेला होता. याउलट स्त्रीसत्ताक समाजात हे अधिकार संपूर्णपणे स्त्रियांच्याच हातात होते. म्हणून स्त्रीसत्ताक समाजात पुरुषांचे स्थान स्त्रियांच्या तुलनेत गौण होते, कर्ता सूर्यदेव म्हणूनच कुंतीला म्हणाला की तो तिचा दास ( वशः ) आहे.

बाबिलोनी 'गिलगामीशचे महाकाव्याचा ( ख्रिस्तपूर्व ५००० ) नायक प्रेमवेडचा मातृदेवता इश्तरला सांगतो, की ती व तिच्या प्रियकरात केवळ दासभावी व अस्थायीच संबंध असू शकतो –

"अहा, पण जर मी तुझ्याशी विवाहबद्ध झालो, तर तुझ्या ( सेवेत ) काय (काम) उपस्थित करावे ?

२५. ( तुझ्या ) देहासाठी मला तेल पुरवले पाहिजे, आणि ( अहा, ) वस्त्रे ( — ही );
( तुझ्या ) भाकरी व ( तुझा ) आहार तुला दिला पाहिजे :
( आणि खरोखरच ) ते तुझ्या उदरनिर्वाहाला भरपूर असले पाहिजे.
देवतेला साजेसे, राजसी इतमामाला योग्य असे मद्यही ( तुला ) सादर केले पाहिजे.

३०. ... असे पहा ... परिधान करायला वस्त्र (– प्रावरणेही पुरवायला तुला )... मी बाँधलेला राहीन.
समजा की मी तुझ्याशी विवाह केला, मग माझा त्यात काय लाभ राहील ?
असा कोणता तुझा पती होता की ज्याच्यावर तू एकनिष्ठेने सदैव प्रेम केलेस ?

असा कोणी तुझा कधीतरी असा स्वामी होता की ज्याने तुझ्यावर प्रभुत्व मिळवले ?

चल, तुझ्या पतींच्या अंतहीन कथा मी तुला निवेदन करतो."[७७]

उत्तर अमेरिकेच्या नात्सेझांमध्ये असेच दासभावी नाते प्रचलित होते–

'उत्तर अमेरिकेत, जेथे प्राचीन समाजाचे लोकसत्ताक व समानतेचे स्वरूप सर्वसामान्यपणे एवढे संपूर्णपणे अबाधित राखले गेलेले आहे तेथे, मिसिसिपीच्या खालच्या खोऱ्यातील कृषक गणामध्ये, विशेषतः नात्सेझांमध्ये, राजप्रथाक संस्था विकसित झालेल्या होत्या, राजसत्ता ही त्यांच्यात अनियंत्रित अधिपतीचे व्यक्तिगत लक्षण नसून सूर्यवंशीयतेच्या जोरावर ऋतूंचे नियमन

करायचे सामर्थ्य बाळगणाऱ्या सामंती कुलाचे लक्षण होते. सूर्यकुलात केवळ स्त्रीवंशपरंपराच मानली जाई. पती हे राजकुलाचे सदस्यही नसत. स्त्रिया पटेल त्या माणसांची सामान्य जनतेतून प्रियकर म्हणून निवड करीत. त्यांना त्यांच्या कुलातल्या पुरुषांशी समागम करायची मनाई होती. त्यांच्या पतींना वा प्रियकरांना कसलेही स्थान नव्हते एवढेच नाही, तर त्यांना सेवकांप्रमाणे वागवले जाई. ते दासाप्रमाणे त्यांच्या राजस्वामिनींच्या सेवेत राहात व त्यांच्यासमोर ते बसूही शकत नसत. सूर्यस्त्रिया त्यांना पटतील तेवढे प्रियकर बाळगू शकत व लहर फिरताच हाकलून देऊ शकत; जर या 'कुत्र्यांच्या'– त्यांचा त्या याच शब्दात उल्लेख करीत– बेइमानीचा त्यांना संशय आला, तर त्यांना परशूने तोडून टाकायचा त्या हुकूम देऊ शकत. एखादी राजस्त्री मेली तर तिच्या पतीला तिच्या थडग्यावर गळा दाबून मारले जाई. त्याचे एखादे अपत्य मेले तर त्यालाही मरणे भाग पडे. सूर्यकुलातील पुरुषांचे राजत्व अशाप्रकारे त्यांच्या मातांपासून निघालेले होते, पित्यांपासून नाही, कारण ते सामान्यजन व दास होते ...'[७८]

मातृवंशक हवाईत अशीच अवस्था होती –

'... मागच्या शतकाच्या सुरवातीला राजाच्या तीन बहिणी राण्या होत्या; इतर राजकन्या जरी लग्न करीत नव्हत्या, तरी त्यांना पटणाऱ्या कोणत्याही माणसाला प्रियकर वा तात्पुरता पती म्हणून त्या स्वीकृत करू शकत– हे स्वातंत्र्य मुळात राजकुलातल्या सर्व स्त्रियांना होते यात शंका नाही ...'[७९]

आफ्रिकेचे मातृवंशक अशांती, लोआंगो, अब्रॉन व उडेंबा हे देश आणखी दाखले देतात –

'गोल्ड कोस्टचे एक सर्वात सुपरिचित राज्य म्हणजे अशांती... राजघराण्यातल्या राजकुमारी त्यांना पटेल त्याच्याशी लग्न करायला मोकळ्या असतात, मग तो दीनतम दास का असेना. त्यांची एकच पात्रता पाहिली जाते, आणि ती म्हणजे ते दिसायला सुंदर असले पाहिजेत. हा राजकन्यापती वा सिंहासनाच्या वारसाचा पिता सर्वथैव महत्वशून्य असतो. राजकन्या जर त्याच्या आधी मेली तर त्याला तिच्या थडग्यावर आत्महत्या करावी लागते. राजकन्येला मूल झाले तर 'पिता त्याला अभिवादन करतो व त्याचे दास्य अत्यंत लाजिरवाण्या पद्धतीने व्यक्त करतो, आणि ते मूल मेले तर पिताही त्याच्याबरोबर मरतो.' राजकन्यांमधल्या मुख्य स्थानावर जिला राजमाता म्हटली जाते ती असते. ती तिचा स्वतःचा करभार वसूल करते व राजाच्या

अनुपस्थितीत राज्याचा कारभार चालवते. राजकन्यांपैकी कोणाही एकीचा मुलगा राजघडवंचीवर* बसवण्याकरता होणारी निवडणूक चार राजकर्ते करतात, पण राजमातेचा त्यावर शिक्कामोर्तब व्हावा लागतो; राजाला पदच्युत करायचाही तिला अधिकार असतो, आणि तिने तो वापरल्याची उदाहरणेही ऐकण्यात आहेत ......

" ... लोआंगोत राजकन्यांना पटेल त्याच्याशी लग्न करायचे स्वातंत्र्य असते, आणि त्या सर्वसामान्यपणे धट्टेकट्टे सामान्यजन निवडतात, ज्यांना त्या पतीसारखे नाही तर खरे म्हणजे दास व कैद्यांसारखेच वागवतात. राजकन्यांकडून ते इच्छेनुरूप (पतिपदावरून) बडतर्फ केले जाऊ शकतात व दुसरा सामान्यजन पती म्हणून स्वीकृत केला जाऊ शकतो; त्यांना सशस्त्र पाहाऱ्याखाली ठेवले जाते, संरक्षणाशिवाय राजवाड्यातून बाहेर पडू दिले जात नाही, आणि क्षुल्लक सबबीवरूनही त्यांच्या राजपत्नींच्या हुकमाने त्यांचा शिरच्छेद व्हायचा धोका असतो. मुख्य राजकन्येला मनि-लोंबो वा राजा म्हणतात. ती तिचा पति निवडते, व त्याला ती इतर राजकन्या त्यांच्या पतींना वागवतात त्याचप्रमाणे वागवते. राजाची नियुक्ती राजकन्यांच्या मुलांमधून होते; राजाचा कोणताही मुलगा कधीही राजा होत नाही; कारण तो राजकन्येशी लग्न करीत नाही, आणि राणी ही त्याची पत्नी नसून मनि-लोंबो असते जिला तो 'माताजी' म्हणून संबोधतो. राज्यकारभाराच्या सर्व बाबतीत त्याला तिचा सल्ला घ्यावा लागतो. डौरा नावाच्या राज्यात राजकन्यांची अशाच प्रकारे दासांशी लग्ने होत असत, आणि राजाची निवड त्यांच्या मुलांमधून होत असे, मृत राजाच्या मुलांमधून नाही. राजमातेचे स्थान अशांती व लोआंगो प्रमाणेच होते. आयव्हरी कोस्टच्या अंतर्भागातील ॲब्रॉन्समध्ये राज्यकर्त्या कुटुंबाबाबत अशीच घटना प्रचलित आहे. राजकन्या कधी कधी लग्ने करतात, पण नियम म्हणून एकटया राहातात व मनाला येईल तेवढे प्रियकर ठेवतात. नवरा असला तरीही त्या तेच करतात. राजकन्या मेली तर तिच्या प्रियकराचा वध केला जातो. उत्तर ऱ्होडेशियातील बंगुलु तलावाजवळच्या उडेंबा नावाच्या छोटया राज्यावर अगदी आतापर्यंत राण्या राज्य करीत होत्या. राज्यकर्त्या राणीची

---

* राज्याभिषेकाच्या वैदिक विधीत 'सिंहासनाचा' थांगपत्ता नाही. आसन्दी नावाची घडवंचीच आहे ( वाजसनेयि संहिता, १०.२६ ) आसन्दी हे गणसभागृहातले एक आसन होते, एकमेव नाही. अभिषेक तर व्याघ्रचर्मावरच होई ( वाजसनेयि संहिता, १०.१७ ).

अनुक्रमणिका

पदवी मन्प्यूमर वा राजमाता अशी होती; पण ज्या राजाला ती जन्म देई तो देशाचे शासन करण्यात कोठल्याही प्रकारचा भाग घेत असल्याचे मात्र आढळून येत नाही. फादर गिल्लेमे म्हणतो, "राज्ञीपदाशी निगडित असलेले विशेषाधिकार अनेक असतात. सर्वांत अनन्य म्हणजे राण्यांनी त्यांचे पती सामान्य-जनामधून निवडायचा, जो नियुक्त अशाप्रकारे राज्ञीपती बनतो तो देशाच्या राज्यकारभारात मात्र कोणताही भाग घेत नाही ... " ;[८०]

अथिकल ही मल्याळम्‌मध्ये राजपुत्राची एक पदवी आहे. या शब्दाचा अर्थ दास वा सेवक असाही होतो. [८१]

कर्ता हा स्वतंत्र असतो की परतंत्र या वादाला संस्कृत व्याकरणात महत्वाचे स्थान आहे. 'स्वतन्त्रः कर्ता–' १.४.५४ या पाणिनीय सूत्रानुसार क्रियेने निर्देशित केलेल्या मुख्य कर्त्याची प्रथमा विभक्ती (कर्तृसंज्ञा) होते, उ० देवदत्तः पचति (देवदत्त रांधतो)। पण समस्या उभी राहते प्रयोजक क्रियापदाने निर्देशित केलेल्या कर्त्याच्या बाबतीत– देवदत्तो यज्ञदत्तेन ओदनं पाचयती (देवदत्त यज्ञदत्ताकडून भात रांधून घेतो)। येथे स्वयंपाकाच्या क्रियेचा मुख्य कर्ता जरी यज्ञदत्त असला, तरी त्याची तृतीया विभक्ती (करणसंज्ञा) होते; म्हणजे खरा कर्ता स्वतंत्र नाही! या सूत्राचा शब्दशः अर्थ होतो की (क्रियेचा) कर्ता हा स्वतंत्र असतो. पण भाष्यकार पतंजलि असे सिद्ध करायचा वृथा खटाटोप करतो, की प्रयोज्य कर्ता हा क्रिया करण्यात जरी प्रयोजक कर्त्याचा आज्ञांकित असला, तरी तो (प्रयोज्य कर्ता) क्रिया करायची की नाही याबाबत स्वतंत्र असतो (... यदि च प्रेषितोऽसौ न करोति स्वतंत्रोऽसौ भवति इति।).[८२] जर या सामंती वैयाकरणाच्या गृहदासाने त्याची अवज्ञा करून म्हटले असते– "तुमच्या– 'स्वतन्त्रः कर्ता' – या सूत्रानुसार मला तुमची अवज्ञा करायचे स्वातंत्र्य आहे," तर वैयाकरणातल्या 'प्रयोजक कर्त्याने' त्याला जीवघेणा दम दिला असता– 'मग मलाही तुला तुझ्या परम मुक्तीपर्यंत, मृत्यूपर्यंत, फटके मारायचे स्वातंत्र्य आहे!"

पाणिनि हा जरी एक सर्वश्रेष्ठ वैयाकरण असला, तरी त्याच्या अष्टाध्यायीच्या सर्वच सूत्रांचा तो जनक नाही. अनेक विख्यात वैयाकरण त्याचे पूर्वसूरि होते आणि या विराट सूत्रसंभाराची घडण पाणिनीपूर्वी कित्येक शतके अगोदर पासून चालू होती. पाणिनि हा ख्रिस्तपूर्व सहाव्या ते चौथ्या शतकांच्या दरम्यान झाला असे मानण्यात येते; पण त्याचा काळ बुद्धोत्तर होता हे मात्र निश्चित.[८३] त्याच्या काळापर्यंत भारताचे सामंतप्रथाक युग सुरू होऊन गेलेले होते

आणि शेती या उत्पादनाच्या एका मूलभूत क्षेत्रात दासश्रम आर्थिकदृष्टचा केव्हाच कालबाह्य झालेले होते. शेती व हस्तव्यवसायातल्या 'स्वतंत्र' शूद्र कर्मकरांच्या श्रमांनी राज्यकर्त्या सामंतवर्गावर केलेल्या समृद्धीच्या अभूतपूर्व वर्षावातून गृहदासपद्धतीची भरभराट झाली. पाणिनि व पतंजलि हे स्वतः सामंतवर्गीय असल्यामुळे त्यांना साहजिकच हे शूद्र त्यांच्या गृहदासांच्या तुलनेत 'स्वतंत्र' वाटले. पतंजलीची प्रसवधर्मी प्रतिभा सामंती उत्पादनव्यवस्थेच्या एका महत्त्वाच्या अंगाचे वर्णन केल्यावाचून राहिलेली नाही–

'... पतंजलीकडून आपल्याला समजते की नांगरण्यासाठी कर्मकर लावले जात असत. त्यातून शेताच्या मालकाला ( शेताच्या ) कोपऱ्यावर बसून वैतनिक कर्मकरांनी चालवलेल्या नांगरटीवर देखरेख ठेवणे शक्य होई ( एकान्ते तूष्णीम्– आसीन उच्यते पञ्चभिर्– हलैः कृषतीति । तत्र भवितव्यं पञ्चभिर्– हलैः कर्षयतीति । भाष्य, २. ३३ ) ...'.[८४]

म्हणून अगोदरच प्रचलित असलेले एखादे सूत्र वैयाकरणांनी त्यांच्या कामाकरता उपयोगात आणले असणे सर्वात संभवनीय दिसते. पतंजलि स्वतंत्रचा अर्थ विणकर, वैदिक तन्तुवाय, असा देतो ( यस्य स्वं तन्त्रं स स्व–तन्त्रः । ) पण १०. ७१. ९ या ऋचेत आलेल्या तन्त्र या शब्दाला खुद्द वैदिक काळात वेगळा अर्थ होता असे दिसते. चट्टोपाध्याय विवरण करतात–

'ब्राह्मणांबरोबर वा देवांबरोबर वा सोमसवन करणाऱ्यांबरोबर परिभ्रमण न करणारे हे विद्याहीन व ज्ञानशून्य पापी शब्दोच्चारण करीत असल्यामुळे व सीरिः असल्यामुळे तन्त्र वृद्धिगत करतात ( तन्वते तन्त्रम् ).

'येथे आपल्याला सीरिः' या शब्दाचा सबंध ऋग्वेदात एकमेव वापर आढळतो व त्याचा अर्थही काहीसा अनिश्चित आहे. मोनियर विल्यम्स व मॅक्डोनेल काहीशा डळमळीतपणे मत व्यक्त करतात; की त्याचा अर्थ विणकर, बहुधा स्त्रीजातीचा, होत असावा. पण विल्सन् त्याचा अर्थ हालिक असा करतो. उघड आहे की सायणाची सूचना त्याला स्वीकारार्ह वाटते जो सीरिः शब्दांचा अनुवाद सीरिणः, सीर वा नांगर चालवणारे, असा करतो; आपण जर हा अनुवाद मान्य केला तर अशाप्रकारे बहिष्कृत केले गेलेले लोक शेतकरी झालेले दिसतात.......

'...... येथे आपल्याला तन्त्र या शब्दाचा सबंध ऋग्वेदातला एकमेव उल्लेख आढळतो. सायण तन्वते तन्त्रम्‌चे विवरण करतो; कृषि–लक्षणं विस्तारयति कुर्वन्ति, शेतीचा विस्तार करतो वा ( शेती ) करतो......'[८५]

या वैदिक पुराव्यावरून स्व-तन्त्रचा अर्थ होतो जो स्वतः शेती करतो वा तिचा विस्तार करतो, आणि हा स्व-तन्त्र म्हणजे प्राचीन भारतीय स्त्रीसत्ताक समाजांमधला कर्ता होय. पण मग अशा इसमांना सीरिन् असे का म्हणत ? लाङ्गल या नांगरासाठी वापरल्या जाणाऱ्या दुसऱ्या शब्दाचा अर्थ पुरुषाचे लिंग असाही होतो, असे निरुक्त ( ६-२६ ) म्हणते.

१.११७.२१ ही ऋचा अश्विनीकुमारांना नांगराने जव पेरीत असल्याचे दाखवते—

यवं वृकेण अश्विना वपन्ता इषं दुहन्ता मनुषाय दस्रा ।
अभि दस्युं बकुरेणा धमन्ता उरु ज्योतिश् चक्रथुर् आर्याय ॥

[ ( पर्जन्यवृष्टीने ) कृषीची अभिवृद्धी करणाऱ्या अश्विनीकुमारांनो, नांगराने जव पेरून*, मानवासाठी अन्नाचे दोहन करून व वज्राने दस्यूंचा नाश करून तुम्ही आर्यांना सर्वदूर ( जीवन- ) प्रकाशाचा लाभ करून दिलात. ]

परंतु देवांमधला अभिजात शेतकरी पूषन् आहे. १.२३.१५ ही ऋचा त्याला बैलांच्या सहाय्याने जमीन नांगरताना व जवाचे पीक काढताना दाखवते. ६.५६.४ व १०.२६.१ या ऋचा त्याला त्याच 'दस्र' या नावाने आवाहन करतात. ज्या नावाने १.११७.२१ ही ऋचा अश्विनी कुमारांना संबोधते. दुर्गाच्या मते त्याचा अर्थ होतो. 'कृषि, इत्यादि कर्मे पर्जन्यवृष्टीने वृद्धिगत करणारे.'[८६] पूषन् हे पृथ्वीचे एक नाव असल्याचे निघण्टु (१.१.१९) सांगतो. म्हणजे पुल्लिंगात पूषन्‌चा अर्थ भूमिपुत्र असा व्हायला पाहिजे. शतपथ ब्राह्मण (१.१०२.१७) त्याला भागदुघ, म्हणजे '(देवांचे) भाग वाटप करणारा,' असे म्हणतो.[८७] या कार्याचा वारसा त्याने त्याच्या भूमातेपासून घेतला असावा हे उघड आहे.

वर्गसमाजात हे कार्य व त्याचा कर्ता या दोघांचे त्यांच्या विरुद्धात परिवर्तन होते. भाग-दुघ हा राजाचा करवसुली करणारा अधिकारी होतो,[८८] तर बृहदारण्यक उपनिषद् (१.४.१३) त्याचा देवगणाच्या शूद्रवर्णात कायाकल्प करते.[८९]

भारतीय दासप्रथेच्या ऐन भरातही, जेव्हा सर्व उत्पादक काम केवळ दास-कर्मकरच करीत, पेरणीच्या उत्सवाचे (वप्ण-मङ्गल) उद्घाटन मात्र संघगणांच्या राजे व गणवृद्धांना त्या दिवशी नांगर चालवून करावे लागे.

* हरबरा हे रब्बी पीक अजूनही नांगराने पेरतात. एकजण नांगर हाकलतो, व दुसरा मागून फाडीत हरबरे टाकीत येतो.

अनुक्रमणिका

जातकाची निदान-कथा शाक्य गणाचा राजा शुद्धोदन व ७९९ गणवृद्ध त्यादिवशी अनुक्रमे सोने व चांदी यांच्या मुठी असलेले नांगर चालवीत असल्याचे वर्णन करते.[९०] यावरून कर्त्याने राष्ट्र गणभूमीची विधिपूर्वक मशागत करायच्या जादूची परिणामकारकता परंपरेत कशी चिवटपणे चिकटून राहिली होती हे दिसून येईल.

कर्ताचा दुसरा पर्यायवाची शब्द आहे. क्षत्ता ६.१३.२ ही ऋचा अग्नीचे क्षत्ता म्हणून आवाहान करते. अथर्ववेदीय ऋचा ९.६.१ ( ४९ ) ही ब्रह्मन्‌चे क्षत्ता म्हणून आवाहन करते व त्याचे भाग-दुघशी समीकरण करते.[९१] बौद्ध धर्मग्रंथात केवळ ब्रह्माकरताच कत्ता हे नामधेय योजले जाते.[९२] कत्ता हे कर्ताचे पालि रूप आहे. पालि धर्मग्रंथामध्ये ब्रह्माकरता अभि–भू हे दुसरे नाव प्रयुक्त होते.[९३] अभिभूचा अर्थ आहे पराभूत करणे, व म्हणून ती फाशांची विजयी फेक आहे. तैत्तिरीय संहिता ( ४.३.३.१–२ ) सांगते की अभि–भू या डावाचे अधिदैवत बृहस्पति, देवांचा ब्रह्मन्, हे आहे. विधुर जातक ( ५४५ ) सांगते की यक्ख पुण्णकाने कुरूंच्या धनञ्जय राजापासून त्याचा कत्ता विधुर हा जिंकून घेतला.[९४] विधुर हा चंद्र नावाच्या ब्राह्मणाचा मुलगा होता हा केवळ योगायोग म्हणता येणार नाही.[९५]

सामूहिक उत्पन्न गणसदस्यांमध्ये वाटायच्या मंगल कार्याचे पुढे फाशाच्या अभि–भू या विजयी फेकीत निरवशेष तादात्म्य झाले. कत्ता हा जुगाऱ्यांच्या कानाला लागणारा सर्वात मधुर ( कोइल–महुले, कोकिल–मधुरः ) शब्द असल्याच्या मध्ययुगीन भारतातल्या जुगाऱ्यांमधील अर्थहीन वाटणाऱ्या परंपरे-मागील पार्श्वभूमी ही आहे. जुगारी संवाहक मृच्छकटिक नाटकात ( अंक २ ) गातो—

> "कत्ता–शद्दे णिण्णाणअश्श हलइ हडकं मणुश्शश्श ।
> ढक्का–शद्देव्व णडाधिवश्श पब्भट्ट–लज्जश्श ॥ "

[ "पदच्युत झालेला राजा ज्याप्रमाणे महोत्सवातील कोलाहलाचा 'ढक्का' शब्द ऐकून बेभान होतो, त्याप्रमाणे जुगारात उठणारा 'कत्ता' शब्द ऐकून निर्धन ( जुगारी ) माणूस ( द्यूतालयाकडे ) खेचला जातो." ]

क्षत्ता हा अश्वमेध यज्ञातील ब्रह्मन्, होता, अध्वर्यु व उद्‌गाता या मुख्य ऋत्विजांबरोबरचा एक ऋत्विज् होता. वाजसनेयि संहितेच्या २३.२२–३१ या मंत्रांद्वारे ब्रह्मन् व महिषी (पट्टराणी), उद्‌गाता व वावाता (आवडती राणी), होता व परिवृक्ता ( परित्यक्ता राणी ), आणि क्षत्ता व पालागली ( शूद्र

राणी ) यांच्यात एवढा अश्लील संवाद होतो की केवळ संभोगक्रियाच बाकी राहाते, आणि महिषी तर बळी दिलेल्या घोड्याबरोबर प्रत्यक्ष संभोगाचा अभिनय करते.[१६] परंतु येथे लक्षात घेतले पाहिजे ते हे की, उद्गाता व परिवृक्ता-क्षत्ता व पालागली, हे आपली अश्लील वक्तव्ये शेतीविषयक उपमांनी सजवतात. या विधीवरून आपण असा निष्कर्ष काढू शकतो की, तो मुळात स्त्रीसत्ताक गण व निसर्ग यांचे पुनरुत्पादन करण्यासाठी साजरा केला जाणारा क्षत्र राष्ट्री व ब्रह्मन् क्षत्ता यांच्या देवविवाहाचा विधी होता.

आर्यांच्या पितृसत्ताक दैवी राजेशाहीबरोबर क्षत्त्याचे एका बाजूला राजाच्या कंचुकीसारख्या खाजगी कारभाऱ्यात व दुसऱ्या बाजूला दासात रूपांतर होते. महाभारताचे एक सर्वांत भव्योदात्त व महाप्रज्ञ पात्र असलेला क्षत्ता विदुर शूद्र होता, आणि ब्रह्मन् व्यास व कुरूचा राजा विचित्रवीर्य याची विधवा राणी अंबिका इची दासी यांच्या संयोगातून झालेले संतान होता ( १.१०५.२४–३० ) स्त्रीसत्ताक वा मातृवंशक दैवी संयोगाचे आता त्याच्या विरुद्धात रूपांतर झाले आहे; कारण क्षत्र वा राज्यकर्त्यांला जन्म देण्याऐवजी ते क्षत्त्याला, दासाला जन्म देते आहे !

परंतु प्राचीन भारतीय इतिहासाचा एक सर्वांत मोठा विरोधाभास हा आहे की विदुर, जो पितृसत्ताक कौरवांचा क्षत्ता दास म्हणून जगला व मेला, तो सीमंतिनी कुंतीच्या पोटी ज्येष्ठतम पांडव धर्मराज युधिष्ठिराला जन्माला घालणारा तिचा ब्रह्मन् क्षत्ता होऊ शकला. महाभारताच्या नंतरच्या संस्करणांनी विदुर व युधिष्ठिर हे दोन्ही मृतांचा धर्मराजा यम याचे अवतार होते अशी कथा शोधून काढून या 'विसंगतीची' विल्हेवाट लावायचा प्रयत्न केलेला आहे. ( १.१०६–१०७, १.१२२.१–६; १५.२७.२५–३० ) !

सांख्य तत्त्वज्ञानाचा पुरुष हा प्रकृतीचा नियतकालिक ब्रह्मन् आहे. प्राचीन काळात दासाला पुरुष असेही संबोधीत असत.

जगन्माता प्रकृति व असंख्य पुरुष यांचे संयोग स्त्रीसत्ताक गणाची राष्ट्री व तिचे नियतकालिक ब्रह्मन् धर्मपती यांच्या देवविवाहांवर आधारलेले आहेत. पुरुषबहुत्व हा सांख्य तत्त्वज्ञानाचा मूलभूत सिद्धांत आहे हे या तत्त्वज्ञानाच्या उपलब्ध असलेल्या प्राचीनतम कृतीवरून, सांख्यकारिकेवरून, दिसून येईल ( १८ ) –

जनन-मरण-करणानां प्रतिनियमाद् अयुगपत् प्रवृत्तेश् च ।
पुरुष-बहुत्वं सिद्धं त्रैगुण्य-विपर्ययाच् च एव ॥

अनुक्रमणिका

[ जन्म, मृत्यु, ( जीवनाची ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये ही ) साधने व्यक्तिगणिक वेगळी असल्याने, सर्वांचे पेशे एक नसल्याने, आणि तीन गुणांचे ( संमिश्रण ) प्रत्येकात निरनिराळे असल्याने, पुरुषांचे बहुत्व सिद्ध होते. ]

ज्याप्रमाणे क्षत्राचे ब्रह्मनांशी देवविवाह हे स्त्रीसत्ताक गण व त्याच्या शासनाची उत्तराधिकारी यांच्या पुनरुत्पादनासाठी होते, त्याप्रमाणे प्रकृतीचे पुरुषांशी संयोग सांख्यांच्या पदार्थांचे ( categories) जगत् व या जगत्–शासनाची उत्तराधिकारी यांच्या पुनरुत्पादनांसाठी होते. सांख्यात प्रकृति व तिची महत् वा बुद्धीपासून थेट शेवटच्या पदार्थापर्यंतची सृष्टी त्रिगुणयुक्त आहे, तर पुरुषमात्र त्रिगुणविहीन आहेत ( कारिका १७. ) हे तीन गुण केवळ भूमाता व तिची मानवी प्रतिनिधी असलेली गणमाता यांचेच वैशिष्टच होते हे अगोदरच दाखवले गेलेले आहे. म्हणून प्रकृतीची सर्व अपत्ये ( विकार ) तिच्याप्रमाणेच स्त्रीलिंगी आहेत. या सर्व पदार्थांच्या, कुलपा व जनपद कल्याणींच्या, प्रमुखपदी आहे बुद्धि वा महत् , जगताच्या स्त्रीसत्ताक शासनाची उत्तराधिकारी.

सांख्यकारिकानुसार ( ११ ) प्रकृतीचे पुरुषांशी संयोग म्हणजे ‘ विरोधी तत्त्वांचे समन्वयमात्र ’ [९९] आहेत–

त्रिगुणम् अविवेकि विषयः सामान्यम् अचेतनम् प्रसवधर्मि ।
व्यक्तं तथा प्रधानम् तद् विपरीतस् तथा च पुमान् ॥

[ ( अव्यक्त ) प्रकृति व ( तिचे ) व्यक्त ( विकार ) त्रिगुणयुक्त, विवेकरहित, सामान्य ( सामायिक ) उपभोगाचे विषय, चेतनाविहीन व प्रसवधर्मी आहेत; तर पुरुष ( बहुतेक बाबतीत ) विरोधी ( गुणधर्मांचा ) आहे. तर ( काही बाबतीत ) समान ( गुणधर्मांचा, शाश्वतता व अव्यक्तता हे गुणधर्म असलेला ) ]

असंख्य पुरुषांच्या नित्यतेचा सिद्धांत हा समाजशास्त्र व तत्त्वज्ञान या दोन्ही दृष्टींनी विसंगतिग्रस्त आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने तो संघगणवादी जैनतत्त्वज्ञानाकडे घेऊन जातो, ज्या अन्वये जगातल्या प्रत्येक चेतन वा अचेतन, वस्तूमध्ये नित्य असा जीव असतो. समाजशास्त्रीय दृष्टयाही तो असमर्थनीय आहे; कारण भूमातेची मानवी प्रतिनिधी गणमाता ही नित्य व चिरतरुण मानली जात असे, तर तिचे धर्मपती नियतकालिक व नाशिवंत.

अशाप्रकारे प्रकृतीचे पुरुषांशी संयोग हे अविरत विरोधांची ऐक्ये होती. जगातली प्रत्येक वस्तु ही अविच्छिन्नपणे विरोधांचे ऐक्य व संघर्ष आहे ही

वस्तुस्थिती आमच्या प्राचीन पूर्वजांच्या नजरेतून सुटली नव्हती. महाभारत म्हणते ( १४.१२.१ )–

परस्परं तयोर् जन्म निर्द्वंद्वं न उपपद्यते ॥

[ ( प्रत्येक वस्तूतल्या ) विरोधांचा जन्म ( एकसमयावच्छेदेकरून व ) अन्योन्याश्रयी असतो, ( व अशाप्रकारे ) विरोधांचे ऐक्य व संघर्षांवाचून एकही वस्तु नसते. ]



संदर्भ —


६३. पां. वा. काणे, उक्त, पा. २२२–२२३.

६४. उक्त, पा. २२५.

६५. उक्त, पा. २२३–२२५.

६६. उक्त.

६७. लक्ष्मण सरूप, उक्त, पा. १७९.

६८. पां. वा. काणे, उक्त, पा. २२३–२२५; जे. पृझिलस्की, द साल्वाज, इंडियन स्टडीज : पास्ट अँड प्रेझेंट, खंड २, क्र. १, पा. ५७–५८

६९. उक्त, द उदुम्बराज, इंडियन स्टडीज : पास्ट अँड प्रेझेंट, खंड १, क्र. ४, पा. ७४१–७४३, ७५४–७५६.

७०. रॉबर्ट ब्रिफा. उक्त, पा. ४६४.

७१. डब्ल्यू. डी. व्हिटने, उक्त, पा. ५९५.

७२. उक्त, पा. ७४९.

७३. जॉर्ज थॉमसन, स्टडीज इन एन्शंट ग्रीक सोसायटी, खंड १, पा. ३३४.

७४. आर. ई. ह्यूम, द थर्टीन प्रिन्सिपल उपनिषद्स, पा. ३०४.

७५. पां. वां. काणे, उक्त, पा. २२३–२२५.

७६. इरावती कर्वे, उक्त, पा. ३०३–३०४.

७७. पी. आर. टी. गुर्डान, द खासीज, पा. ८७–८८; इरावती कर्वे, उक्त, पा. ४१६.

७८. सी. आर. थॉम्पसन, द एपिक ऑफ गिळगामीश, पा. ३२–३३.

७९. रॉबर्ट ब्रिफॉ उक्त, खंड ३, पा. २५–२६.

८०. उक्त, पा. २६–२७.

८१. उक्त, पा. ३०–३२.
८२. ई. थर्स्टन व के. रंगाचारी, उक्त, खंड १, पा. ३–४.
८३. वासुदेवशास्त्री अभ्यंकर व्याकरण–महाभाष्य, भाग २, पा. १८५.
८४. वासुदेव शरण अग्रवाल, उक्त, पा. ४७२–४७३.
८५. उक्त, पा. १९९–२००.
८६. देवी प्रसाद चट्टोपाध्याय, उक्त, पा. ६५४.
८७. लक्ष्मण सरूप, उक्त, पा. १०७.
८८. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड १३, पा. १६.
८९. उक्त, खंड ४१, पा. ६२–६३: ए. बी. कीथ, द वेद ऑफ द ब्लॅक यजुस् स्कूल, हा. ओ. से., खंड १८, पा. १२०.
९०. आर. ई. ह्यूम, उक्त, पा. ८४.
९१. जातक ( हिंदी ), खंड, १, पा. १२६; देवराज चानना, स्लेव्हरी इन एन्शंट इंडिया, पा. ४३–४४.
९२. डब्ल्यू. डी. व्हिटने उक्त, पा. ५९५.
९३. जगदीश काश्यप ( सं. ), उक्त, १,८.३८.
९४. उक्त.
९५. जातक ( हिंदी ), खंड ६, पा. ३२१.
९६. उक्त, पा. ३००.
९७. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४४, पा. ३८६–३८७; श्रीधरशास्त्री पाठक, वाजसनेयि संहिता, पा. ३९६–३९९.
९८. ए. बी. कीथ, उक्त, पा. १२०; द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४१, पा. ६१.
९९. एच. टी. कोलब्रुक, द सांख्यकारिका, पा. ५७–५८.
१००. ए. के. कुमारस्वामी, उक्त, पा. ३०.

प्रा. शंकर लक्ष्मण चोरघडे

# " कृत्रिम पर्जन्य "

---

माणसाला जगण्यासाठी पाणी आवश्यक असते. तो ज्या अन्नावर जगतो ते अन्न देणाऱ्या वनस्पतींना आणि प्राण्यांनाही पाणी आवश्यक असते पाण्याला आपण जीवन म्हणतो ते याच कारणामुळे. आपल्याला हवे असणारे पाणी आपण मुख्यत्वेकरून पावसापासून आणि त्यामुळे निर्माण झालेल्या नद्या, विस्तीर्ण जलाशय, विहिरी, कालवे, भूमि–अंतर्गत पाण्याचे साठे इत्यादींपासून मिळवतो.

पाण्यासाठी आपण निसर्गावर अवलंबून असतो. निसर्ग अत्यंत लहरी आहे. नैऋत्य मॉन्सूनचा पाऊस हा निसर्गाचाच एक आविष्कार आहे. तोही तितकाच लहरी आहे. आगमन किंवा निर्गमन यांच्या बाबतीत नियमितता, पर्जन्यवितरणाच्या बाबतीत समप्रमाणता, तीव्रतेच्या बाबतीत सुसंगती यासारखे गुण मॉन्सूनमध्ये नाहीत. कधी तो अत्यंत प्रभावी बनून सर्वत्र मुसळधार पाऊस पाडतो, कधी दुर्बल होऊन पर्जन्यदानात कृपण व्यक्तीसारखा वागतो, तर कधी तो आपले कर्तव्यच विसरतो व मॉन्सूनच्या पावसात दीर्घ कालावधीचे खंड निर्माण करतो. ह्या सर्वांचे परिणाम म्हणजे दरवर्षी भारताच्या काही क्षेत्रांवर पर्जन्याधिक्यामुळे महापूर तर काही क्षेत्रांवर अवर्षणामुळे दुष्काळ उद्‌भवतात. पुरेशा पाण्याचा अभाव म्हणजे एक दारुण संकटच ! पावसाळ्यात पाऊस जर कमी पडला. तर जलाशयात पुरेसे पाणी साठत नाही. ऊर्जानिर्मितीचे प्रमाण घटते, पिके खुरटतात, वाळतात, नाश पावतात; जलसिंचन योजना निकामी ठरतात, गोड पाण्याचे पूर्वीचे साठे रिकामे होतात...

आणि मग माणूस पाणी मिळविण्यासाठी नवनवीन उपाय शोधू लागतो !

काही लोक सामुदायिक धार्मिक विधी करतात, देवांना साकडे घालतात. पर्जन्यसूक्त–पठण, पर्जन्ययज्ञ, महारुद्र स्वाहाकार करतात. संगीततज्ञ संगीतमहोत्सव करून वरुणदेवतेचे वरदान मागणारे, ढगांना ढवळणारे, वाऱ्यांना वळविणारे, आर्द्रतेला आळविणारे राग गातात ! काही लोक बेडकांची मिरवणूक काढतात ! अडला नारायण गाढवाचे पाय धरी; क्वचित् प्रसंगी गाढवाचीही पूजा करण्यात येते !



अनुक्रमणिका






शास्त्रज्ञ ढगांवर काही क्रिया-प्रक्रिया-विक्रिया करून ढगांतील पाणी काढून घेता येते का ते पाहतात.

नैऋत्य मॉन्सूनच्या ऋतूंत भारतातील एका "लाक्षणिक पर्जन्यमय दिवसा"त पंचवीसशे कोटी टन जलबाष्पाचे पावसात रूपांतर होते व सबंध वर्षा ऋतूत याच्या हजारपट जलबाष्प भारतात येते असा वातावरणविज्ञांनी अंदाज केला आहे. सर्वत्र सारख्या प्रमाणात पाऊस पडत नाही हा निसर्गाच्या पर्जन्यवितरण यंत्रणेचा दोष आहे. त्यात पर्वतरांगांच्या दिक्स्थितीचा बराच वाटा आहे. सह्याद्री पर्वताच्या रांगा पर्जन्यवाहक वातप्रवाहांच्या मार्गात प्रलंब दिशेने येत असल्यामुळे अनुवात पार्श्वावरील काही ठिकाणी वर्षातून २०० ते ५०० सें. मी. इतका पाऊस पडतो, तर वातविमुख क्षेत्रावर केवळ १० ते ३० सें. इतका पाऊस पडतो. दुष्काळाचा फटका वातविमुख किंवा पर्जन्य-छायेत असलेल्या क्षेत्रांनाच बसतो. पाण्याची खरी गरज तेथेच जास्त प्रमाणात भासते.

भारतासारख्या कृषिप्रधान देशाचे भवितव्य सर्वस्वी नैऋत्य मॉन्सूनवर अवलंबून असते. गेले कित्येक महिने तामिळनाड, कर्नाटक व गुजरात राज्यात अतिशय कमी पाऊस पडला. तामिळनाडूमध्ये पाण्याचा अभाव इतका जाणवू लागला की त्या राज्याने अगतिक होऊन कृत्रिम पर्जन्य पाडण्याचे तंत्र अवगत असणाऱ्या अमेरिकन तंत्रज्ञांना पाचारण केले ! त्यांनी श्री. फ्रेड क्लार्क यांच्या नेतृत्वाखाली दिनांक १५ व १६ जुलै १९७५ ला मद्रासजवळच्या रेड हिल्स व पुंडी जलाशयांच्या पाणलोट क्षेत्रात कृत्रिम पर्जन्याचे प्रयोग केले व ते यशस्वी झाल्याचे लगेच जाहीर केले ! रेड हिल्स तलावात २ मिमी. पूंडी जलाशयात २६ मिमी. आणि तिरुथानी जलाशयात ४२ मिमी. पाऊस पडला असा त्यांनी दावा केला ! या प्रयोगासाठी १२ लक्ष रुपये खर्च होऊन मद्रासजवळच्या पूंडी जलाशयात ७० कोटी गॅलन पाणी जमले व मद्रासचे पाण्याचे दुर्भिक्ष आता संपले आहे असेही तामिळनाडूच्या सरकारी प्रवक्त्याने अधिकृतपणे वर्तमान-पत्रकारांना सांगितले !

गेली काही वर्षे भारताच्या अनेक भागात कमी अधिक प्रमाणात पाऊस पडत आहे. त्याच्यातही एक आवर्तन निर्माण झाल्याचे आढळले आहे. पाण्याची उणीव भरून काढण्यासाठी कृत्रिम पर्जन्याचे प्रयोग भारतात करता येतील का, ते सफल होतील का, या प्रश्नांना मद्रास ( तामिळनाडू ), कर्नाटक, उत्तर प्रदेश, बिहार, कच्छ, मध्य प्रदेश व मध्यमहाराष्ट्र या भागातील अवर्षणजन्य परिस्थितीने वाचा फोडली आहे.

न वर्षणाऱ्या ढगातून पाऊस काढून घेणे कसे शक्य आहे ते आता आपण पाहू या.

कृत्रिम पर्जन्याचे तंत्र

आकाशात अनेक ढग आले तरी सर्वच वेळी सर्वच ढगांतून पाऊस पडत नाही हे आपण प्रत्यही पाहतोच. असंख्य आर्द्रताग्राही (जलशोषक) पदार्थांच्या कणावर जलबाष्पाचे संद्रवण झाल्यामुळे ढग निर्माण होतात. एखाद्या छोट्या राशिमेघात १ किलो टन ( किंवा ८ एकर-फोट ) जलबाष्प असते. गर्जन्मेघासारख्या उंच वाढणाऱ्या ढगात ५०,००० किलोटन जलबाष्प असते. मेघकणाचा व्यास साधारणपणे २० मायक्रॉनपेक्षा कमी असतो आणि त्यांचा पतनवेग प्रतिसेकंदाला एक शतांश ते ५ सेंमी. इतका अल्पसा असतो. हे कण पर्जन्यरूपाने खाली पडू शकत नाहीत. वाऱ्यांच्या ऊर्ध्व व क्षैतिज प्रवाहाबरोबर ते ढगात इतस्ततः भ्रमण करीत असतात. मंद तुषारवृष्टीत जलकणांचा व्यास २०० मायक्रॉनपेक्षा अधिक असतो. पावसाच्या थेंबांचा व्यास ६ मिमी. किंवा ६००० मायक्रॉनएवढा असू शकतो. त्यांचा पतनवेग प्रति सेकंदाला ७० सेंमी ते ९ मीटर इतका असतो. मेघकण, तुषारकण व वृष्टिकण यांत फरक फक्त आकाराचाच असतो. पावसाच्या एका थेंबात १० लक्ष मेघकण सामाविलेले असतात. मेघकण वाढवून मोठा केला की पाऊस पाडणे शक्य होते. त्यासाठी शीतित बर्फाचे कण ( म्हणजे गोठलेले कार्बन डायऑक्साइडचे कण ), सिल्व्हर आयोडाइड, पोटॅश आयोडाइड, किंवा संगजिरा व मीठ यांचे मिश्रण ढगात सोडतात. ह्या कणांमुळे ढगात संक्षोभ-विक्षोभ-प्रक्षोभ वाढतो. ढगांचे स्वरूप बदलते. ते अस्थिर होतात. थेंब इतस्ततः फिरू लागतात. एकमेकांवर आदळू लागतात. कधीकधी ते फुटतात, तर कधीकधी त्यांचे संमीलन होते. अशा " आघात व संमीलन " क्रियेने थेंबाचा आकार वाढतो. त्यांचा पतनवेगही वाढतो. हा पतनवेग ढगातील उदग्र प्रवाहाच्या वेगापेक्षा अधिक झाला की ते थेंब पर्जन्यरूपाने खाली पडू लागतात. खाली पडताना ते थेंब लगतची हवाई ओढतात. त्यामुळे अधःप्रवाह निर्माण होतात. कधीकधी त्यांना द्रुतप्रवेगी चंडवाताचे स्वरूप येते.

ऊष्मीय दृष्ट्या ढग दोन प्रकारचे असतात : शीत मेघ व उष्णतर मेघ. हिमरेषेच्या पलीकडे जाणारे, अत्युच्च वाढणारे मेघ शीतमेघ असतात. अशा ढगात जेथे ऊर्ध्व प्रवाह असतात त्या ठिकाणीच कणबीजन केले पाहिजे. त्यामुळे जलबाष्पाचे संद्रवण होते. अवस्थांतर झाल्यामुळे अप्रकट संद्रवण-उष्णता मुक्त होते. त्यामुळे ढगांची उंची व जाडी वाढते. ढग हिमरेषेपेक्षा उंच झाला

अनुक्रमणिका

की त्यात हिमकण व अतिशीतित पाण्याचे जलबिंदू निर्माण होतात. ते समोरासमोर आले की बर्फकणांवर अतिशीतित जलबिंदूंचे आक्रमण होते. बर्फकण आकाराने वाढू लागतात. ते फार मोठे झाले की खाली पडू लागतात. बर्फाच्या स्वरूपात जमिनीकडे येणाऱ्या घनीभूत जलबिंदूचे खालील हवेच्या उष्णतर तापमानामुळे पाण्यात रूपांतर होते व पाऊस पडू लागतो. हाच तो कृत्रिम पर्जन्य ! हिमरेषेच्या खालीच वृद्धी झालेल्या उष्णतर ढगांतील जलबिंदू "आघात व संमीलन" क्रियेने मोठे केले जाऊन पाऊस पाडण्यात येतो.

### कृत्रिम पर्जन्याचे काही प्रयोग

मेघबीजन करून हवामानात बदल घडवून आणण्याच्या प्रयोगांना खरी सुरवात इ. स. १९४० मध्ये झाली. प्रा. आर्यव्हिंग लँगमूर यांच्या मार्गदर्शनाखाली डॉ. व्ही. जे. शेफर यांनी विमानातून अतिशीतित ढगात– ७८° सें. तापमान असलेले शुष्क बर्फाचे म्हणजे गोठलेले कार्बन डायऑक्साइडचे कण विखुरले. अल्पावधीत शीत हिमाचे असंख्य कण ढगातून बाहेर पडून ढग वितळवू लागले. डॉ. फोनेगुट यांनी– ५° सें. तापमानाचे सिल्व्हर आयोडाइडचे कण ढगात पेरून हाच प्रयोग यशस्वी करून दाखविला. धुके म्हणजे जमिनीवरचे स्तरमेघच. त्यांच्यामुळे विमानवाहतूक धोक्यात येते. जगात सर्वत्र विमानतळावरील अतिशीतित धुकी वितळविण्यासाठी गोठलेल्या कार्बन डायऑक्साइडच्या किंवा सिल्व्हर आयोडाइडच्या कणांचा वापर करण्यात येतो. फ्रान्समध्ये द्रवीभूत प्रोपेन तर रशियात लेड आयोडाइड वापरण्यात येते. अशा प्रयोगांमुळे अतिशीतित धुकी वितळविण्यात हमखास यश येते असा अनुभव आहे. उष्णतर धुक्यांच्या बाबतीत अशी खात्री देता येत नाही. हिमतुषारांकापेक्षा अधिक तापमान असलेली उष्णतर धुकी म्हणजे आत्यंतिक स्थिरावस्था प्राप्त झालेले स्तरमेघ. ऊर्जा–समुपयोजन करून त्यात सहजासहजी अस्थिरता निर्माण करून ते नष्टप्राय करता येत नाहीत. अनेक ठिकाणी जाळ करून धुकी तापविणे, आर्द्रताग्राही पदार्थांचे कण विस्तृत प्रमाणावर धुक्यात विखुरणे, परिचालकांकरवी (propellers करवी) ऊर्ध्व दिशेने हवेचे स्रोत फेकून धुक्याखाली असलेल्या हवेचे नीचतम थर ढवळणे, विमानतळाच्या धावपट्टीवर जेट विमाने ओळीने उभी करून जेटइंजिनांकरवी उष्ण हवेचे फवारे धुक्याने ग्रासलेल्या हवेत सोडणे. द्रुतगतीने जलसंयोग साधणाऱ्या अनेक विद्युत–विच्छेद्य ( electrotype ) पदार्थांचे कण धुक्यात विखुरणे इत्यादी प्रक्रियांनी उष्ण धुकी वितळविण्याचे अनेक प्रयोग केले गेले पण समाधानकारक असा एकही मार्ग अजून सापडला नाही.

इतर प्रकारच्या मेघांत परिवर्तक पदार्थांचे बीजकण पेरून त्या मेघांचे रूपांतर करण्याच्या सर्वच प्रयोगांत अपेक्षित यश आले नसले तरी काही प्रसंगी वृद्धीला स्तिमित करून टाकणाऱ्या घटना प्रत्ययास आल्या. एका प्रयोगात उत्तर अमेरिकेत अतिशीतित स्तरराशिमेघांनी व्यापिलेल्या १०० चौरस किमी. क्षेत्रात. ५ किमी. अंतर असलेल्या १६ किमी. लांबीच्या तीन रेषात प्रत्येकी १०० पौंड अतिशीतित कार्बन डायऑक्साइड म्हणजे शुष्क बर्फांचे कण विखुरले. पण त्यामुळे पर्जन्य किंवा हिमवृष्टी न होता सर्व ढग पांगू लागले. ढगात बीजकण पेरून त्यातून जलबिंदू काढून घेण्याच्या उद्देशाने केलेल्या अनेक प्रयोगात ढगच वितळून गेले व जमीन कोरडी राहिली. काही ठिकाणी मात्र हिवाळ्यात निरुत्साही करणाऱ्या ढगाळलेल्या आकाशात मेघबीजन करण्यात आले व ढग वितळवून सुखद सूर्य-प्रकाशाची देणगी लोकांना बहाल करण्यात आली. याच्या उलट, मिशिगन सरोवरातील ढग पांगविण्यासाठी केलेल्या प्रयोगात एक राशिमेघ अनपेक्षितपणे अत्युच्च पाळीपर्यंत वाढला, त्यात द्रुतप्रवेगी चंडवात निर्माण झाले आणि सतत एक तासपर्यंत जोरदार शीत पर्जन्य– व हिम–वृष्टी करून लोकांना त्रस्त केले ? दुसऱ्या एका प्रयोगात– ८° से. तापमानाच्या उच्च पातळीपर्यंत वाढ-लेल्या गर्जन्मेघात विमानाकरवी गरजेपेक्षा अत्याधिक प्रमाणात सिल्व्हर आयोडाइडचे कण पेरले गेले. ह्या कणाधिक्यामुळे हिमानी क्रिया ( glacia-tion ) विवर्धित झाली. ढगातील पाण्याचे अल्पावधीत अगणित हिमकण तयार झाल्यामुळे त्यांनी मुक्त केलेली किंवा उत्सर्जित झालेली अप्रकट संद्र-वण–उष्णता ढगातील हवेला मिळाली. त्यामुळे ढगाची उत्प्लावकता ( buoyancy ) अतिरेकी प्रमाणात वाढली. अवघ्या २० मिनिटात ढग उंच वाढला. त्याची जाडीही वाढू लागली. ४० मिनिटांनी प्रचंड मेघविस्फोट होऊन अतोनात वर्षण व्हावयाला सुरवात झाली ! आणखी एका प्रयोग-मालिकेत १४ गर्जन्मेघात बीजारोपण केले गेले, त्यातील १० ढग नुसते उंचच वाढले; ४ ढगांचा विस्फोट झाला ! यावरून एक महत्त्वाचे अनुमान निघते : ते हे की, आपण ढगांची रूपरेषा, स्वरूप, जीवनकाल व जीवनवृत्त किंवा जीवन-क्रम ( Life History ) बदलू शकतो. पर्जन्यनिष्कर्षणाबद्दल मात्र आपण ग्वाही देऊ शकत नाही ! अमेरिकेत केलेल्या कृत्रिम पर्जन्याच्या प्रयोगाबद्दल " यू एस्. नॅशनल ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस " या वैज्ञानिक संस्थेने आपले मत दिले आहे ते असे : " काही विशिष्ट प्रकारच्या ढगांच्या व वादळांच्या समूहात रासायनिक बीजारोपण तंत्रांचा वापर करून पर्जन्यात वाढ करता येईल अशी आशा बाळगण्याइतपत वाढत्या प्रमाणावर पण संदिग्ध किंवा अनेकार्थी सांख्यि-कीय पुरावा उपलब्ध होत आहे. "

अनुक्रमणिका

परिणाम कसेही असोत, पण मेघबीजनाचे प्रयोग दुर्लक्षिण्यासारखे नाहीत !

कृत्रिम पर्जन्याचे प्रयोग आतापर्यंत जवळ जवळ ५० राष्ट्रांनी केले आहेत. प्रत्येक राष्ट्राची तंत्रे वेगवेगळी आहेत. हे प्रयोग इझराईलमध्ये यशस्वी, मिसूरी ( उत्तर अमेरिका ) मध्ये अनिर्णायक, अॅरिझोनामध्ये दुर्लक्षणीय किंवा नगण्य ठरले " आम्ही गारांच्या वर्षावामुळे होणारे नुकसान ९० टक्क्यांनी कमी करू शकतो," असा दावा सोव्हियट युनियनच्या शास्त्रज्ञांनी केला आहे, तर " मेघबीजन करून आम्ही उग्र चक्री वादळाशी निगडित असलेला प्रचंड पवनवेग १० टक्क्यांनी कमी करू शकतो," असा दावा अमेरिकन शास्त्रज्ञ करीत आहेत ! मेघबीजनामुळे वाऱ्यांच्या दिशेने ४५० ते ५०० किमी. पर्यंत पाऊस वाढतो असे ऑस्ट्रेलियन शास्त्रज्ञ म्हणतात ! गारांची वादळे शमविण्यात फ्रान्स, जर्मनी, अर्जेंटिना व इटलीत यश आल्याचे सांगण्यात येते !

## कृत्रिम पर्जन्याचे भारतात प्रयोग

भारतात कृत्रिम पर्जन्याचे प्रयोग इ. स. १९५२ मध्ये कै. डॉ. सुधांशु-कुमार बॅनर्जी यांनी कलकत्ता येथे, इ. स. १९६६ मध्ये प्रा. एस्. के. घोस यांनी पाटणा येथे आणि पुण्याचे डॉ. रमणमूर्ती आणि त्यांचे सहकारी यांनी इ. स. १९५७ ते १९६६ च्या कालावधीत उत्तर भारतात दिल्ली, आग्रा व जयपूर येथे व दक्षिण भारतात मुन्नार येथे केले. त्यांच्या अनुमानाप्रमाणे, अशा प्रयोगांमुळे पावसात ४० टक्के वाढ होऊ शकते ! पुण्याच्या इंडियन इन्स्टिटयूट ऑफ ट्रॉपिकल मिटिऑरॉलॉजीच्या शास्त्रज्ञांनी इ. स. १९७४ मध्ये पुण्याच्या पूर्वेकडील १६०० चौरस किमी. क्षेत्रात व उत्तर प्रदेशातील रिहांड-धरण-जलाशयाच्या परिसरात मेघबीजन करून कृत्रिम पावसाचे प्रयोग केले. त्यांचे निष्कर्ष व मूल्यमापन अजून व्हायचे आहे. तथापि, " आम्ही पावसासाठी एक लाख रुपये खर्च करून ३५ लाख रुपये किंमतीची ऊर्जा-निर्मिती केली " असा कोणी तरी दावा केला ! इन्स्टिटयूटने मात्र या बाबतीत मौन पाळले आहे ! दिनांक १५ व १६ जुलै १९७५ ला तामिळनाडूत कृत्रिम पर्जन्याचे यशस्वी प्रयोग केले गेले आणि त्यांचे फार कौतुकही झाले. कृत्रिम पर्जन्याच्या या अत्याधुनिक मोहिमेचे नेते श्री. फ्रेड क्लार्क यानी दिनांक १८ ऑक्टोबर १९७५ ला वृत्तपत्रकारांना सांगितले. " आम्ही मेघ-बीजनाचे प्रयोग केले नसते तर मद्रास शहराला सध्या जे पाणी मिळत आहे ते मिळाले नसते. मद्रास शहराजवळच्या जलाशयातही सध्या जितके पाणी साठले गेले आहे तितके साठविले गेले नसते. आमचे प्रयोग संपूर्णतया यशस्वी झाले

अनुक्रमणिका

आहेत. आम्ही ३१ ऑक्टोबर १९७५ पर्यंत मद्रासच्या आसपास कृत्रिम पर्जन्याचे प्रयोग करणार आहोत. ३ नोव्हेंबर १९७५ ला आम्ही अमेरिकेत परत जाऊ व आम्हाला निमंत्रण दिल्यास आम्ही भारतात पुनः परत येऊ ....

" या क्षेत्रात दरवर्षी कृत्रिम पर्जन्याचे प्रयोग केले पाहिजेत. येथील पाण्याचे साठे वाढविण्याचा हाच एक उपाय आहे. "

" आम्ही पॉयपर कामांच नावाच्या दोन एंजिनांच्या विमानातून ४००० ते ६५०० मीटर उंचीवर जाऊन, एकंदर १४० तास उड्डाण करून, एकूण १०,००० ग्रॅम सिल्व्हर आयोडाइड ढगात विखुरले. केवळ मद्रासलाच नव्हे तर कोइंबतूर व निलगिरी विभागातही आम्ही मेघबीजन केले. हे प्रयोग यशस्वी झाले आहेत याबद्दल शंकाच नको ! "

कृत्रिम पर्जन्याच्या प्रयोगाच्या यशस्विततेबद्दल काढलेल्या या उद्‌गारांचा परामर्ष आपण पुढील विभागात घेणार आहोत.

## कृत्रिम पर्जन्याची यशस्वितता

" जागतिक वातावरणवैज्ञानिक संघटने"ने कृत्रिम पर्जन्याच्या अनेक प्रयोगाची चिकित्सा केली आहे. " कृत्रिम रीतीने हवामान किंवा जलवायुमान बदलण्याच्या प्रयोगाचे यश मर्यादित आहे. हवामानाचे रूपांतर करण्याचे शास्त्र अजून प्रायोगिक अवस्थेत आहे. या बाबतीत खूपच ध्येयनिष्ठ व वस्तुनिष्ठ संशोधन करणे आवश्यक आहे' असे मत W. M. O. ने अधिकृत रीत्यां दिले आहे.

कृत्रिम पर्जन्यासाठी प्रायोगिक मेघांची संपूर्ण निरीक्षणे आवश्यक असतात. ढगाची उंची, त्यांच्या विविध भागात तापमानाचे वितरण, आर्द्रतेचे वितरण, एकक आकारमानात मेघकणांची संख्या, त्यांच्या आकारांच्या अभिसीमा, संशीत केंद्रकांची ( फ्रीझींग न्यूक्लियांची ) संख्या, त्यांच्या आकाराचे वितरण, त्यांची निर्मितित्वरा, बदलत्या तापमानाप्रमाणे त्यांच्या गुणधर्मात घडून येणारे फरक, पर्जन्यबिंदूंची संख्या व त्यांचा भ्रमणवेग, ढगातील ऊर्ध्वप्रवाह व अधःप्रवाहांची स्थाने, या सर्व घटकांची पूर्ण माहिती ढगाचे यशस्वीरीत्या जलीकरण करण्यासाठी सुरुवातीला हवी असते. अशा निरीक्षणासाठी सध्या सर्वत्र सर्व साधने व उपकरणे उपलब्ध नाहीत. कृत्रिम पर्जन्याच्या प्रयोगाचे यश सीमित असते ते ह्या कारणामुळेच? शिवाय, मेघबीजनाच्या प्रक्रिया अतिशय खर्चाच्या आहेत. मेघबीजनासाठी केलेल्या विमानाच्या एका उड्डाणासाठी ३००० रुपये खर्च होतात. इ. स. १९७३–१९७४ साली पुणे परिसरात केलेल्या कृत्रिम पर्जन्याच्या प्रयोगासाठी ५ लक्ष रुपये खर्च झाले होते ! ह्या वर्षी तामिळनाडूत केलेल्या प्रयोगासाठी १२½ लक्ष रुपये खर्च केले गेले !

अमेरिकेने कृत्रिम पर्जन्याच्या बाबतीत खूपच प्रगती केली आहे. "गतिमान मेघबीजन" ( dyuamic cloud seeding ) करण्याचे तंत्र त्यानी शोधून काढले आहे. ह्या तंत्राप्रमाणे विमान ७००० मीटर उंचीवर नेऊन तेथून आर्द्रताग्राही सिल्व्हर आयोडाइडचे कण विपुल प्रमाणात खालील ढगात सोडले जातात. अप्रकट संद्रवण उष्णता मुक्त झाल्यामुळे ढगात एकाएकी उत्प्लावकता निर्माण होऊन ढग खूप उंच वाढू लागतो. ढगात अनंत हिमकण निर्माण होतात व ढग अस्थिर होतो. विविध प्रक्रियांची ही शृंखला कृत्रिम पर्जन्यासाठी आवश्यक असते. व्हिएटनामच्या युद्धात हो ची मिन्ह यांच्या सैन्याला होणाऱ्या पुरवठ्याचे मार्ग तोडण्यासाठी व व्हिएटनामच्या लोकांना महापुरात बुडविण्यासाठी हे आधुनिक पर्जन्यास्त्र अमेरिकेने वापरले असा त्यांच्यावर आरोप करण्यात येतो. इतरत्र अमेरिकन पद्धती आर्थिक दृष्टया लाभदायक आहेत. अल्पावकाशात दर मैलाला ४५० गॅलन अशा त्वरेने बीजवितरण करणारी साधने, रॉकेट, विमाने, रेडार, गणकयंत्रे, स्वयंचलित स्वयंविस्फोटक फुगे ( weather bombs ), क्षेपणयंत्रे, पायरोटेक्निक जनरेटर, कॉंप्रेसर मशीन, फवारणी–यंत्रे इत्यादी साधने– उपकरणे अमेरिकन पर्जन्यनिर्मात्यांच्या मदतीला सदैव सज्ज असतात. अनेकदा त्यांना नेत्रदीपक यश येते. त्याचे एक उत्तम उदाहरण येथे नमूद करण्यासारखे आहे इ. स. १९७१ साली दक्षिण फ्लोरिडा, टेक्सास, ॲरिझोना, आणि ओक्लाहामा या राज्यात तीव्र दुष्काळ पडला. पिके, झाडे वाळली, जमिनी कोरड्या पडल्या, द्रुतगती वाऱ्यामुळे जमिनींच्या सुपीक थरांचे उत्क्षरण होऊ लागले. वणवे पेटू लागले, जमिनीचा कस कमी होऊ लागला, तेव्हा तेथील लोकांनी, "कसेही करा पण ढगात पर्जन्यदायक रसायनांचे बीज पेरून आमच्या तृषार्त जमिनींना पाणी द्या" अशी वातावरणविज्ञांना विनंती केली. त्यांनी केंद्रीय शासनाची परवानगी घेऊन ७ मे १९७१ ला प्रयोग केले आणि १००,००० ( एक लक्ष ) एकर–फीट म्हणजे १ कोटी २५ लक्ष ( १,२५,००,००० ) टन पाऊस पाडला ! ह्या मोहिमेचे मार्गदर्शन प्रसिद्ध महिला शास्त्रज्ञ डॉ. जोन सिंपसन यांनी केले होते ! येथे पाडलेल्या पावसामुळे खर्च–आणि–तात्कालिक–नफा यांचे गुणोत्तर १ : ३२ असे पडले !

भारताने अशी तंत्रे अवलंबिली पाहिजेत. भारतातील सध्याच्या कृत्रिम पर्जन्याच्या यंत्रणा प्रायोगिक व प्राथमिक स्वरूपाच्या आहेत. ह्यासाठी ठिकठिकाणच्या ढगांच्या लक्षणांचा व गुणधर्मांचा अभ्यास व संशोधन आवश्यक आहे.

ह्या वर्षी नैऋत्य मॅन्सूनच्या कालावधीत ( १ जून ते ३० सप्टेंबर १९७५ पर्यंत ) लक्षद्वीप, केरळ, कर्नाटक, तामिळनाडू, आंध्रप्रदेशाची किनारपट्टी, मराठवाडा, मध्य महाराष्ट्र, गुजरात, राजस्थान, हरयाना, पंजाब, उत्तर प्रदेश, जम्मू, काश्मीर या राज्यात सरासरी पर्जन्यापेक्षा २० टक्याहून अधिक पाऊस पडला. रायलसीमा, तेलंगण, कोकण, गोवा, मध्यप्रदेश, पश्चिम बंगाल या राज्यांत सरासरी पर्जन्यापेक्षा किंचित अधिक पाऊस पडला. सौराष्ट्र, कच्छ, दीव, पर्वतीय पश्चिम बंगाल, ओरिसा या राज्यात सरासरी पर्जन्याच्या फक्त २ ते ४ टक्के कमी पाऊस पडला. केवळ बिहारच्या समस्थळीवर ( पठारावर ) सरासरी पर्जन्याच्या फक्त ७ टक्के कमी पाऊस व बिहारच्या सखल प्रदेशात २ टक्के कमी पाऊस पडला; ईशान्य भारतात नेहमीच खूप पाऊस पडतो. या वर्षी आसाम, मेघालय, अरुणाचल, नागालँड, मणिपूर, मिझोराम, त्रिपुरा या राज्यात सरासरीपेक्षा फक्त ८ ते १६ टक्यांनी कमी पाऊस पडला. म्हणजे ह्यावर्षी पावसाचे प्रमाण सर्वत्र समाधानकारक होते. तामिळनाडूत केलेल्या कृत्रिम पर्जन्याच्या यशस्विततेचे भांडवल करणाऱ्यांनी ही घटना लक्षात घ्यावी. तामिळनाडूत कृत्रिम पर्जन्याचे प्रयोग केले नसते तरी ह्यावर्षी तेथे भरपूर पाऊस पडला असता असे जर कोणी म्हटले तर त्यात चूक होणार नाही !

आर्थिक व सामाजिक दृष्टचा मेघबीजनाच्या प्रयोगांचे परिणाम अति दूरगामी असू शकतात. विमानतळावरील धुकी वितळविण्यात यश आले तर लक्षावधी उतारूंचे हवाई प्रवास सुकर व सुखरूप होतील. गारांचा वर्षाव करणाऱ्या ढगांचे मंदायन करता आले तर कोटचवधी रुपयांच्या धान्याची व मालमत्तेची नासाडी टळेल. हव्या त्या ठिकाणी, पाहिजे त्या वेळी, हव्या त्या प्रमाणात कृत्रिम उपायांनी पाऊस पाडता आला तर आधुनिक मानवी संस्कृतीच्या जलीय शृंगापत्तींना यशस्वीपणे तोंड देता येईल. गरिबांची उपासमार टळेल.

पण कृत्रिम पावसाच्या प्रयोगात एक मोठा राजकीय अनर्थ दडला आहे. राजस्थानकडे जाणारा ढगाचा पाऊस गुजरातने मध्येच काढून घेतलेला राजस्थानला आवडणार नाही. डी. कृष्णरावच्या तोंडचा घास पी. अनंतरामनला मिळालेला सी. मुथ्थण्णाला पाहवणार नाही. राज्यांतर्गत तंटे वाढतील.

सध्याच्या परिस्थितीत तरी कृत्रिम पर्जन्य हा एक जुगार आहे. प्रत्येक वेळी हुकमी दान पडेलच याची त्यात निश्चिती नाही !

अवर्षणावर कृत्रिम पर्जन्य हा प्रभावी उपाय कधीच होऊ शकणार नाही ! पर्जन्य देणारे ढग निर्माण करण्याचे सामर्थ्य मानवात नाही.

◆ ◆ ◆

समीक्षा :

प्रा. शं. आ. परांडेकर

# भारतीय वनस्पतींचा इतिहास*

नागपूर विद्यापीठातर्फे इ. स. १९७४ च्या अखेरीस वर दिलेल्या नावाचा सुमारे २३२ पृष्ठांचा ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे. यामध्ये विद्यापीठाच्या रा. ब. श्रीधर गणेश परांजपे स्मारक व्याख्यान मालेत डॉ. चिं. ग. काशीकर एम्. ए. डि. लिट्. यांनी वर उल्लेख केलेल्या विषयावर दिलेल्या व्याख्यानांचा सारांश दिला असून त्यामुळे सामान्य वाचकांना काही भारतीय वनस्पतींची ऐतिहासिक माहिती सुबोध पद्धतीने व त्रोटकपणे उपलब्ध होत आहे. तसेच ह्या वनस्पतींच्या इतिहासावरून आजचे प्रगत वनस्पतिशास्त्र कोठे कोठे व कसे उगम पावले आणि त्याचा विकास कसा होत गेला यासंबंधीची उद्बोधक व साधार माहितीही मिळू शकते.

पाश्चात्य देशांत वनस्पतिशास्त्राचा विकास कसा होत गेला यासंबंधीची माहिती वनस्पतिशास्त्राच्या उच्च पातळीवरील उपलब्ध पाठ्य पुस्तकांतून कमी जास्त प्रमाणात आज मिळते. त्यामध्ये भारतीय वनस्पतींची माहिती फारच थोडी मिळते आणि भारतात वनस्पतिशास्त्र कसे प्रगत होत गेले याची संगतवार माहितीही अत्यल्पच आढळते. ती उणीव या ग्रंथाने बव्हंशी भरून काढली गेल्याने व्याख्याते व विद्यापीठ अभिनंदनास पात्र आहेत, याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही. कुलगुरु मा. पु. स. मेने यांच्या प्रास्ताविकावरून ग्रंथाची त्रोटक रूपरेखा सहज ध्यानात येते; तसेच लेखक (व्याख्याते) डॉ. चिं. ग. काशीकर यांच्या प्रस्तावनेतील तपशील पाहिल्यास ते वनस्पतिशास्त्रज्ञ नसतानाही

* भारतीय वनस्पतींचा इतिहास : लेखक— डॉ. चिं. ग. काशीकर
प्रकाशक— नागपूर विद्यापीठ प्रकाशन, नागपूर; मूल्य दहा रुपये.





त्यांनी अनेक जुन्या व नव्या ग्रंथांच्या आधारे संकलित केलेली माहिती वनस्पतिशास्त्राच्या विद्यार्थ्यांना व शिक्षकांना उपयुक्त ठरेल याबद्दल शंका उरत नाही.

आपल्या रोजच्या आहारातील अनेक वनस्पतिजन्य वस्तू ( धान्य, फळे, भाज्या, इ. ), रोगनिवारणार्थ उपयोगात असलेल्या वनस्पती, आपल्या पाळीव पशूंकरिता उपयुक्त गवते, धान्ये, खाद्ये इ. आणि याशिवाय रोजच्या अनेक इतर गरजा ( कापड, लाकूड, रंग, तेले, इ. ) भागविण्यास आपण वापरीत असलेल्या वनस्पती यांची निवड, लागवड, प्रसार व सुधारणा ज्या आपल्या अनेक पूर्वजांनी करून तत्संबंधीची माहिती संकलित करून ठेविली व मानवजातीची संस्कृती पुढे चालू ठेवण्यास सोयिस्कर साधनेही उपलब्ध केली. त्या आपल्या आद्य पूर्वजांची बहुमोल कामगिरी या ग्रंथातून वाचावयास मिळते हे भाग्यच समजण्यास हरकत नाही. वनस्पतिविज्ञान ( वनस्पतिविषयक माहिती ) व वनस्पतिशास्त्र ह्या संज्ञा हल्ली समानार्थीच वापरतात; लेखकाने प्रस्तावनेत आपण वनस्पतिविज्ञान ही संज्ञा संकुचित अर्थानेच वापरली असल्याचे म्हटले आहे. या ग्रंथात दिलेल्या अनेक भारतीय वनस्पतींच्या मर्यादित माहितीच्या स्वरूपाच्या संदर्भात दोन्ही संज्ञेतील फरक मान्य होण्यासारखा आहे. वनस्पती ही संज्ञा मात्र हल्ली व्यापक अर्थानेच मराठीत सामान्यपणे वापरली जाते व मराठी शास्त्रीय वाङमयातही तशीच वापरतात; वनस्पती म्हणजे सजीवांच्या प्राणी व वनस्पती अशा दोन प्रकारांपैकी एक; याला अपवाद फक्त दोन्हीच्या सीमारेषेवर असलेले काही सजीव ( उदा. सूक्ष्मजीव सूक्ष्मजंतू व काही कवक प्रकार ).

ह्या ग्रंथातील पहिल्या भागात : ( १ ) वैदिक वाङमयातील वनस्पती, ( २ ) प्राचीन जगातील वनस्पती, ( ३ ) वेदोत्तर कालीन वनस्पतिविज्ञान ( ४ ) आयुर्वेद वाङमयातील वनस्पतिविज्ञान व ( ५ ) मध्ययुगीन व अर्वाचीन वनस्पतिविज्ञान ही प्रकरणे असून दुसऱ्या भागात काही वनस्पतींचा इतिहास दिला आहे. ह्या ग्रंथात समाविष्ट असलेल्या सर्व वनस्पती, संबंधित पदार्थ व प्रसिद्ध व्यक्ती इत्यादींचा अंतर्भाव शेवटी मराठी सूचीत केला असून रोमन लिपीत आलेल्या वनस्पतींच्या नावाची इंग्रजी सूचीही दिल्याने वाचकांची संदर्भविषयक गरज भागते; तसेच प्रारंभी व प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी दिलेली आधारभूत संदर्भ-ग्रंथांची यादी ही या ग्रंथाच्या उपयुक्ततेत भर घालते ही विशेष उल्लेखनीय बाब आहे. शुद्धिपत्रकात नमूद केलेल्या मुद्रणदोषांखेरीज अन्य काही मुद्रणदोष राहून गेले आहेत. एकंदर मजकुराची

मांडणी मुद्देसूद व भाषा सुबोध असून माहिती भरपूर असल्याने हा ग्रंथ वाचनीय व संग्राह्य झाला आहे हे निर्विवाद. त्या मानाने त्याचे मूल्य रु. दहा अल्पच आहे.

पहिल्या प्रकरणात वैदिक वाङ्मयात आढळणाऱ्या म्हणजे सुमारे तीन हजार वर्षांच्या दीर्घ कालखंडातील ( इ. स. पू. २५०० ते इ. स. ५०० ) वनस्पतींची तोंडओळख करून देण्यात आली आहे. यज्ञकर्म, मनुष्यांचा आहार, पशूंचा आहार व विशेषत: मनुष्यांचे रोगनिवारण इत्यादींकरिता उपयोगात आणलेल्या काही वनस्पती येथे अंतर्भूत केल्या आहेत. वनस्पतींच्या शरीराचे भाग, त्यांचे आकार व शेतीच्या पद्धतीसंबंधी काही माहिती या वाङ्मयात असल्याचे नमूद आहे; काही काल्पनिक योनींच्या ( राक्षस, चेटके, भूतपिशाचे इ. ) नाशास उपयुक्त असणाऱ्या वनस्पतींचा निर्देश आढळतो. या प्रकरणात काही प्राचीन वनस्पतींच्या संस्कृत नावांचे मराठी ( परिचित ) पर्याय दिले आहेत; उदा. अलाबू ( भोपळा ), प्रश्नपर्णी ( पिठवन ), अश्वत्थ ( पिंपळ ), अश्मगंधा ( अश्वगंधा ) इत्यादी. तसेच कित्येक इतर वनस्पतींचे देता आले असते; उदा. अर्क ( रुई ), अपामार्ग ( आघाडा ), अमला ( आवळा ), पर्ण ( पलाश, पळस ), यव ( जव, सातू ), अलाका ( माका ), इ. ते दिले असते तर वाचकांना त्या वनस्पतींची तेथे ओळख पटली असती पृष्ट ४ वर अपामार्गाच्या माहितीत " विभिन्दन असे त्याच्या पित्याचे नाव आहे, " म्हणजे कुणाचे हा बोध होत नाही. पृष्ठ १८ वर लाक्षा या वेलीच्या वर्णनात असेच (" अजबभ्रू हे तिच्या पित्याचे नाव आहे " ) वाक्य आले आहे एखाद्या सामान्य वनस्पतीच्या पित्याला निराळे नाव कसे ? ह्या प्रकरणात 'सोम' ह्या वादग्रस्त वनस्पतीविषयीची माहिती चांगली आहे. हल्ली काहींच्या मते Sarcostemma brevistigma Wt. ही वनस्पती सोम असावी म्हणून तिला सोमलता ( सोमवल्ली ) असेच नाव आहे, कारण ती पर्णहीन असून लतेप्रमाणे दुसऱ्या आधारावर भार टाकून वाढते; पृष्ठ २३ वर या वनस्पतीचा उल्लेख आला आहे; तिचे जुने नाव Sarcostemma vimiale होते.

दुसऱ्या प्रकरणात भारतेतर देशांतील प्राचीन वनस्पतींच्या माहितीचा तपशीलवार आढावा घेतला आहे. यामध्ये ॲसीरिया, इजिप्त, चीन, अमेरिका, अरबस्तान इत्यादी देशांतील काही अन्नधान्ये, फळझाडे यांची लागवड व काही औषधोपयोगी वनस्पती यांची मनोरंजक माहिती आलेली आहे. त्यावरून प्राचीन कृषी व वैद्यक यांची चांगली कल्पना येते. विशेषत: थडगी, पिरॅमिड्स्,

भिंतीवरील चित्रे यावरून बांधलेले कयास त्यावेळच्या मानवाच्या शोधक बुद्धीची, कष्टाची, कल्पकतेची व प्रारंभिक संस्कृतीची ओळख करून देतात. ग्रीक व रोमन तत्त्ववेत्ते व त्यांनी अनुभवावरून लिहिलेले ग्रंथ पुढच्या काळातही उपयुक्त ठरले; प्रवास व वनस्पतींच्या माहितीची इतर देशांबरोबर झालेली देवाण-घेवाण यामुळे शास्त्राच्या प्रगतीला बरीच मदत झाली ही गोष्ट चहा, खजूर, तंबाखू, बटाटा व मका यांच्या माहितीवरून समजते. इ. स. पू. १५ १० हजार वर्षांच्या कालातील काही ( गहू, जव ) वनस्पतींचा व त्यानंतर द्राक्षवेलीचा ( इ. स. पू. ६००० ), तागाचा ( इ. स. पू. ४००० ) आणि पॅपिरस या नावाच्या प्रारंभिक कागदाचा उल्लेख मानवाच्या अतिप्राचीन वनस्पतिविज्ञानाची कल्पना देतो. या प्रकरणात कंसात रोमन लिपीत छापलेल्या वनस्पतींच्या नावात स्पेलिंगच्या चुका तर आहेतच शिवाय सर्वच ग्रंथात शास्त्रीय नावातील जातीवाचक संज्ञा ( species ) लहान अक्षराने ( कॅपिटल नव्हे ) सुरुवात करण्याचा आंतरराष्ट्रीय संकेत पाळला गेलेला नाही. ( वंशवाचक म्हणजे genus संज्ञेची सुरुवात कॅपिटल आद्याक्षराने केली, ते योग्यच आहे ); जातिवाचक संज्ञेपुढे संबंधित शास्त्रज्ञाच्या नावाचे संक्षिप्त रूपही लिहिण्याचा आंतरराष्ट्रीय संकेत पाळला असता तर या ग्रंथाला शास्त्रीय दृष्टीने निर्दोष स्वरूप आले असते. पृष्ठ ४३ वर Sorghum vulgare असे म्हटले आहे; तेथे जोंधळा हे मराठी नाव द्यावयाला हवे होते.

तिसऱ्या प्रकरणात भारतातील वेदोत्तरकालीन वनस्पतीसंबंधीची माहिती आलेली आहे. या माहितीतील आयुर्वेदासंबंधीची चर्चा चौथ्या प्रकरणात केलेली आढळते. वनस्पतिशास्त्राचापाया इ. स. पू. सहाव्या शतकापासून ते इ. स. दहाव्या शतकापर्यंतच्या दीर्घकाळात घातला गेला; कारण वनस्पतीसंबंधीचे ज्ञान फार मोठ्या प्रमाणात याच वेळी प्राप्त झाले, असे पाणिनीच्या 'अष्टाध्यायी' या ग्रंथाधारे लेखकाने सूचित केले आहे. तसेच बौद्धकालीन वैद्यकासंबंधी तपशील आला आहे. सम्राट अशोकाच्या शिलालेखांवरून मनुष्य व पशू यांच्या चिकित्सा व रोगनिवारण, आहार, छाया इत्यादींकरिता वनस्पतींची भरपूर लागवड केल्याचे नमूद केले आहे. तक्षशिला व नालंदा ह्या प्राचीन विद्यापीठातील वैद्यकशिक्षण, भिषक्शाला व नावनीतक आयुर्वेदीय ग्रंथ यांमुळे ह्या कालाती प्रगती दाखविली आहे. याच दीर्घ कालखंडातील महाभारत व कौटिलीय अर्थशास्त्र यामध्ये अनेक प्रकारच्या संदर्भात बऱ्याच उपयुक्त वनस्पतींची व विविध प्रकारे केलेल्या त्यांच्या वर्गीकरणाची माहिती दिली असल्याचा उल्लेख आला असून वात्स्यायनाचे कामसूत्र, बृहत्संहिता व द्राविड

वाङ्मय यांमध्येही आलेली वनस्पतिविषयक विविध माहिती संकलित केली आहे. वनस्पतींच्या व्यावहारिक ( मूलभूत गरजेकरिता ) उपयोगातून त्यांचे संवर्धन व त्यातून निश्चितपणे मिळणाऱ्या माहितीतून वनस्पतिशास्त्राचा विकास कसा होत आलेला आहे याचे दिग्दर्शन या प्रकरणातून चांगले होते; भारतीय कृषी, वैद्यक व आहारशास्त्र या शाखांची प्रगती विशेषेकरून या कालात झाली असून वनस्पतींच्या सजीवत्वाची लक्षणे निश्चितपणे अनुभवास येऊन ती षड्दर्शन समुच्चयासारख्या काही ग्रंथांत नमूद असल्याचा उल्लेख स्पष्ट आहे. या प्रकरणात बृहत्संहितेतील " वृक्षायुर्वेद " यासंबंधी बरीच माहिती असल्याचा उल्लेख आहे. त्यावरून वृक्षसंवर्धन, वृक्षसंरक्षण व वृक्षारोपण यासंबंधीची प्रायोगिक माहिती मिळते परंतु आजच्या वनस्पतिशास्त्रात त्याला दुजोरा नाही.

वर उल्लेख केल्याप्रमाणे चौथ्या प्रकरणात भारतीय वनस्पतिशास्त्राच्या एक वेळ फार प्रगत असलेल्या व मानवास अत्यंत महत्त्वाच्या अशा विज्ञानशाखेचा ( आयुर्वेद ) संक्षिप्त इतिहास आलेला आहे. चार वेदांच्या तोडीचे स्थान या शाखेस दिल्याने त्याचे महत्त्व फार पूर्वीपासून ओळखले गेले आहे, हे उघड आहे व त्याचा कालखंडही भारतातील इतर ज्ञानशाखा प्रगत झाल्यावेळेचाच आहे हे मागील हकीकतीवरून ध्यानात येईल. चरकसंहिता ( इ. स. दुसरे शतक ), सुश्रुतसंहिता ( इ. स. तिसरे शतक ), नावनीतक ( इ. स. चौथे शतक ), व अनेक निघंटु-ग्रंथ हे व यांसारखे इतर काही जुने ग्रंथ आयुर्वेदात समाविष्ट आहेत. त्यातील ज्ञानभांडार प्रचंड असून त्यात अनेक औषधी वनस्पती, त्यांचे स्वरूप व त्यांच्यापासून मिळालेल्या अनेक द्रव्यांचे मानवी शरीरावर होणारे परिणाम यांचे तपशीलवार वर्णन आहे; अनेक रोग, त्यांची लक्षणे व त्यावरील उपाय यांची तात्त्विक व व्यावहारिक चर्चा तपशीलवार असून वैद्यांना व्यवसायाच्या दृष्टीने मार्गदर्शनही आढळते; खऱ्या वैद्याची लक्षणे त्यात सांगितली आहेत. औषधी द्रव्यांचे वर्गीकरण व शल्यशालाक्यतंत्र आणि अनेक धातू व पार्थिव द्रव्ये यासंबंधी बरीच माहिती त्या ग्रंथातून दिली गेली आहे. गुणधर्मानुसार वनस्पतींचे वर्गीकरण केलेले तसेच अवयव-प्रधान वर्ग आढळतात ( उदा. फलवर्ग, पुष्पवर्ग, शाकवर्ग. इ. ); ज्यापासून मद्ये बनवितात अशांचा मद्यवर्ग बनवून अनेक मद्यांची नावे दिली आहेत. संस्कृत वाङ्मयात एका वनस्पतीच्या अनेक नावामुळे गोंधळ झालेला आढळतो; तसेच कालाच्या ओघात अनेक वनस्पतींची ओळख आज पटत नाही; कारण त्या वनस्पती दुर्लभ झाल्या असाव्यात असा निष्कर्ष निघतो.

अनुक्रमणिका








चरक, सुश्रुत, वाग्भट इत्यादी जुने व नंतरचे ( मध्ययुगीन व अर्वाचीन ) अनेक नवीन वैद्य यांच्या प्रयत्नाने भारतात वैद्यक ( शास्त्र ) बरेच प्रगत झाले व वनस्पतिशास्त्राच्या प्रगतीस त्यामुळे बरीच मदत झाली हे निर्विवाद; तथापि पुढे पाश्चात्य वैद्यकापुढे दिवसेदिवस आयुर्वेदीय चिकित्सा व पद्धती निष्प्रभ होत गेली हे सत्य आहे. एकाच वनस्पतीपासून मिळणाऱ्या औषधांचा अनेक रोगांवर उपयोग वर्णिलेली कित्येक वैद्यक पुस्तके आजही आढळतात. जंगले कमी झाल्याने अनेक रानटी वनस्पती दुर्लभ झाल्या व त्या ओळखून काढण्याचे ज्ञान कमी होत गेले. या व अशा कित्येक कारणांमुळे आयुर्वेद मागे पडला. अलिकडे पाश्चात्य शास्त्रीय पद्धतींचा उपयोग करून वनस्पतींपासून शास्त्रशुद्ध द्रव्ये मिळवून काही आयुर्वेदीय औषधे बनविली जात आहेत व आयुर्वेदाचा पुनरुद्धार होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

पाचव्या प्रकरणात इ. स. च्या दहाव्या शतकानंतरच्या कालातील वनस्पतिविज्ञानाचा इतिहास आला असून त्यात काही आयुर्वेदीय (निघंटु) ग्रंथातील माहिती अंतर्भूत आहे; याचा उल्लेख मागे केला आहे. या कालातील शारंगधर वैद्य सुप्रसिद्ध ग्रंथकार असून त्याचे तीन वैद्यक ग्रंथ उपलब्ध आहेत व त्यात वैद्यकातील अनेक अंगोपांगांची माहिती आल्याचे नमूद केले आहे. त्याशिवाय यामध्ये ‘ वृक्षायुर्वेद ’ हा महत्वाचा भाग आढळतो. त्यात वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन या संबंधीचा तपशील दिला आहे; परंतु आजच्या तर्कशुद्ध विचारसरणीला न पटणारेही काही विचार (मंत्रतंत्र) व्यक्त केले आहेत. तसेच वात, पित्त, कफ यांचे वृक्षांच्या शरीरप्रकृतीतील अस्तित्व व त्यांचे दुष्परिणाम याचा ऊहापोह आढळतो. वृक्षांच्या जीवनात चमत्कार घडवून आणण्याचे उपचार सांगितले आहेत; ते सध्याच्या वनस्पतिशास्त्रात फार क्वचित वापरले जाणारे असावेत असे दिसते. पाश्चात्त्य देशांत अर्वाचीन कालात (इ. स. पंधराव्या शतकानंतर ) इतर भौतिक शास्त्रातील प्रगतीमुळे वनस्पतिशास्त्र जलद विकास पावले, परंतु भारतात तसे न झाल्याने या शास्त्राची प्रगती पाश्चात्त्य विद्वान भारतात येऊ लागल्यानंतर झाली. यामध्ये पोर्तुगीज, फ्रेंच, डच, डॅनिश व अनेक युरोपियन यांनी येथील वनस्पतींचा अभ्यास केला व अनेक नमुने मायदेशी पाठवून त्यांची पद्धतशीर तपासणी व नोंद केली. इ. स. च्या सोळा, सतरा, अठरा व एकोणीस या शतकात भारतातील अनेक भागातील हजारो वनस्पतींच्या जातींच्या वर्णनाचे विस्तृत ग्रंथ निर्माण झाले. वनस्पतिसंग्रह, शास्त्रीय उद्याने आणि तत्सम अभ्यास केंद्रे स्थापली गेली. भारतीय वनस्पति–सर्वेक्षण संस्था (इ. स. १८९०) स्थापल्यानंतर अनेक प्रकारचे संशोधन सुरू झाले. अनेक

उपयुक्त वनस्पतींची लागवड केली गेली व अर्थोत्पादक वनस्पतींची माहिती देणारे लहान मोठे ग्रंथ प्रसिद्ध झाले. देशाच्या भिन्न भागात स्वतंत्र वनविभाग स्थापून जंगलांचे संरक्षण, संवर्धन व वनसंपत्तीचे उत्पादन यात शास्त्रशुद्धता आणली गेली. औषधीगुणयुक्त वनस्पतीसंबंधीचे अनेक ग्रंथ गेल्या शतकाच्या शेवटी व चालू शतकात प्रसिद्ध झाले आहेत. त्याचप्रमाणे देशाच्या प्रत्येक लहान मोठ्या विभागातील सर्वच वनस्पतींची नोंद व त्यांच्या बाह्यांगाचा व अंतरंगाचा तपशीलवार अभ्यास चालू शतकात सुरू आहे. यातूनच त्यांच्या उपयुक्ततेचे शोध लागत आहेत. वनस्पती व संस्कृती यांचा निकट संबंध असल्याचे वनस्पती व त्यांचा इतिहास यांच्याद्वारे दिसत असल्याने वनस्पतिसृष्टीकडे अधिकाधिक जागरूकतेने पहाण्याची गरज भासते आहे; तसेच त्यांचे संरक्षण आणि संवर्धन यामध्ये संशोधन चालू आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या दुसऱ्या भागात संस्कृत वाङ्मयात आलेल्या अनेक वनस्पतींची व अलीकडे प्रसिद्ध झालेल्या काही ग्रंथांतील उपयुक्त वनस्पतींची तपशीलवार माहिती लेखकाने येथे संग्रहित केली आहे; त्या सर्व सांप्रत सामान्यपणे उपलब्ध होणाऱ्या असल्याने सामान्य वाचकाच्या दृष्टीने ही माहिती उपयुक्तच आहे. यामध्ये त्या त्या वनस्पतीचे संक्षिप्त शारीरिक वर्णन समाविष्ट केले असते तर कित्येक वाचकांना ते अधिक बोधपर झाले असते; परंतु इतिहास देणे हे ह्या ग्रंथातील मुख्य ध्येय असल्याने त्याचा अंतर्भाव केला नसावा हे उघड आहे; शिवाय संस्कृत वाङ्मयात तसे वर्णन आढळले नसावे.

या प्रकरणात काही वनस्पतींची सामान्य मराठी नावे ( पर्याय ) आढळत नाहीत; उदा. अपराजिता = गोकर्ण; अर्क = रुई, मांदार; लाक्षा ( अलक्तक )= अळता ( ? ); कर्णिकार = बाहवा ( Cassia fistula L. ); इ. तसेच रोमनलिपीतील शास्त्रीय नावात स्पेलिंगच्या चुका फार राहून गेलेल्या आढळतात; पृ. ११३ वर खदिराचे लॅटिन नाव Mimosa Catechu दिले आहे; ते Acacia catechu Willd. असे हवे. पृ. १२४ वर जोंधळ्याचे लॅटिन नाव चुकीचे पडले आहे; ते Sorghum vulgare Pers. असे हवे. तंबाखूचा ( पृ. १२५ ) प्रवेश प्रथम इ. स. १५५८ मध्ये युरोपात झाला व असदबेगने ( इ. स. १६०४–१६७५ ) तंबाखू आपल्यास विजापुरात मिळाल्याचे लिहिले आहे; असा उल्लेख करून त्यानंतर रघुनाथ पंडिताने ( १७ वे शतक, 'तमाखू' हा शब्द ( पृ. १२६ ) आपल्या श्लोकात अंतर्भूत केल्याचे म्हटले आहे. त्यावरून संस्कृत वाङ्मयातील तमाखू शब्द ( आणि मराठी तंबाखू ) मूळच्या टोबॅको ह्या इंग्रजी नावावरून आला असावा हे उघड आहे.

वास्तविक तंबाखूचा टोबॅकोस शब्दाचा शोध १५ व्या शतकाच्या शेवटी कोलंबसाच्या खलाशांनी वेस्ट इंडीजमध्ये लावला होता. तमाखू या शब्दाचा अमरकोशात उल्लेख नाही. पृष्ठ १४२ वर बदर याला Flacourtia phracata हा लॅटिन पर्याय दिला आहे; तो बरोबर नाही. त्याच पृष्ठावर बीजपूरक व मातुलुंग एक मानतात असे म्हटले आहे; मातुलुंग म्हणजे महाळुंग असे सध्या मानतात ( पहा अमरकोश ); महाळुंगाचे फळ लांबट पण दोन्हीकडे टोकदार व मध्ये फुगीर असते. पृष्ठ १४८ व १४९ वर वर्णिलेला मंदार वृक्ष पारिजातक ( प्राजक्त ) असावा असे मानतात. अमरकोशात दोन्ही नावे कडुनिंबाला दिली आहेत; ह्याची फुले स्त्रिया केसात घालीत हे असंभवनीय वाटते. मेघदूतातही " बालमंदारवृक्षः " हा उल्लेख प्राजक्ताला उद्देशून वापरला असावा. पृष्ठ १५४ वर लसुणाची ( Allium sativum ) माहिती आली आहे. त्यात " लसुणाच्या २५० जाती आहेत; बसु आणि कीर्तीकर यांच्या मते ३२५ जाती आहेत " असे वर्णन आढळते. जाति हा शब्द इंग्रजीतील species याचा वाचक असल्याने व Allium ही संज्ञा genus याचा वाचक ( वंश ) असल्याने वरील विधाने बरोबर नाहीत. पृष्ठ १५७ वर एककंद लसूण ( Allium Ascalonicum ) व वर उल्लेख केलेला लसूण यांची जात एक आहे असे म्हणून त्याची मीमांसा केली आहे; परंतु तसे नसून ती स्वतंत्र जाती आहे. तिला इंग्रजीत Shallot म्हणतात; ती खाद्य आहे. Allium या वंशात ३२५ जाती नाहीत, ४५०–५०० आहेत. पृष्ठ १६० वर बेहडयाचे वृक्ष रस्त्याच्या कडेला छायेकरिता लावण्यास उपयुक्त असे म्हटले आहे; तथापि तो पानझडी असल्याने थंडीच्या शेवटी व उन्हाळयाच्या मध्यापर्यंत त्याला पालवी नसल्याने छायेच्या दृष्टीने तो सदापर्णी वृक्षापेक्षा गौणच ठरतो.

पृष्ठ १६३ वरच्या शिरिषाचे हल्लीचे लॅटिन नाव Albizzia lebbek Benth. असे आहे; लेखकाने जुने नाव दिलेले दिसते. पृष्ठ १६७ वर शैवाल असा शब्द आहे; संस्कृतात ' शैवल ' असा शब्द आहे असे आढळते ( सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यम् ). तसेच सप्तपर्णाला लॅटिनमध्ये Alstonia scholaris ( L ), असे हल्ली नाव आहे; Echites scholaris नव्हे.

प्रस्तुत ग्रंथात शीपाल, शैवाल, अवका ( शेवले, शेवाळे) व दगडफुले (शैलेय) यांचा उल्लेख आला आहे; परंतु हिरवे द्रव्य नसलेल्या अळंबे, कवक व शिलींध्र (सामान्यतः बुरशी, कुत्र्याची छत्री, काजळी इ. नावांनी ओळखल्या जाणाऱ्या) वनस्पतींचा निर्देश कोठेच आढळत नाही. वास्तविक ह्या गटातील

अनुक्रमणिका

वनस्पती (Fungi) इतर कित्येक वनस्पतींपेक्षाही प्राचीन आहेत; त्यांच्याशिवाय कुजणे, रोग होणे, आंबणे इत्यादी प्रक्रिया होत नाहीत. तथापि पृ. ६१ वर किण्व हा शब्द 'मद्ये' यामध्ये आढळतो; किण्व (yeast) ह्या सूक्ष्म वनस्पतीद्वारेच शर्करेचे मद्यात रूपांतर होते; सुराबीज असे सार्थ नांव किण्वाला वापरलेले आढळते. आधुनिक वैद्यकात याचा बराच उपयोग करतात. 'क्षुम्प' ही संज्ञा वैदिक वाङमयात 'आळंबी' या अर्थी वापरल्याचे कै. केतकरांच्या ज्ञानकोशात नमूद आहे. अनेक अळंबे औषधी आहेत, तर काही खाद्य आहेत. छत्रः, छत्रकः, छत्राकम् व कवक ( अळंबे ) ह्या संज्ञा गीर्वाणलघुकोशात दिल्या आहेत व तेथे मनुस्मृतीचा संदर्भ दिला आहे.

अतिप्राचीन कालापासून मनुष्यप्राणी त्याच्याभोवती असलेल्या परंतु अस्थिर अशा परिस्थितीवर सर्वस्वी अवलंबून राहात आला आहे. परिस्थिती या संज्ञेत निवारा, हवामान, जमीन, पाणी, वनस्पती आणि इतर प्राणी यांचा मुख्यत्वेकरून समावेश करतात. निवाऱ्याकरिता त्याने गुहेपासून सुरवात केली. सर्वच परिस्थितीचे प्रथम न कळतच व पुढे कळून सवरून, त्याने परिचयाने व प्रयत्न आणि चुका या अनुभवाने ज्ञान संपादन केले. त्या ज्ञानाचा फायदा प्रत्येक नव्या पिढीला मिळून ज्ञानसंपन्न मनुष्यसमाज बनत गेला व त्याला स्थिरता प्राप्त झाली. पोषण, आरोग्य, संरक्षण व संवर्धन प्राप्त करून घेण्याकरिता ज्ञानार्जनाची त्याने सतत परंपरा चालू ठेविली व त्यातून भिन्न संस्कृतींचा उगम झाला. यामध्ये त्याला ज्या अनेक वस्तूंची गरज भासली त्या वस्तू त्याने परिस्थितीतील ज्या घटकांकडून मिळविल्या त्यांमध्ये वनस्पतींचा क्रमांक पहिला लागतो. हजारो वर्षे अन्न, वस्त्रे, निवारा व औषधे या मूलभूत गरजा भागविण्याकरिता मनुष्यसमाज वनस्पतिविज्ञान वाढवीत आला आहे; त्या विज्ञानाभावी त्याची प्रगती केव्हाच खुंटली असती. आजच्या मानवाने पंचमहाभूतात्मक परिस्थितीवर विजय मिळविला असण्याचे कारण त्याने ज्ञान–संपादन, –संकलन व–संवर्धन चालू ठेविले आहे. ते प्रचंड कार्य करण्याची त्याची धडपड बऱ्याच अंशी प्रस्तुतच्या 'भारतीय वनस्पतींचा इतिहास' या ग्रंथात वर्णिलेली आढळते. त्याकरिता व्याख्यात्यांनी ( लेखकांनी ) अनेक संस्कृत, इंग्रजी व मराठी ग्रंथांचा उपयोग करून त्यातील भारतीय वनस्पतींची माहिती एकत्रित करून सादर केली हे स्तुत्य.

◆ ◆ ◆

चर्चा —

# जोतिबा : शोध आणि बोध

## ( थोडे स्पष्टीकरण )

---

माझा 'जोतिबा : शोध आणि बोध' हा लेख 'नवभारत'च्या जानेवारी १९७६ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखासंबंधी श्री. श्री. रा. टिकेकर यांची प्रतिक्रिया फेब्रुवारी १९७६ च्या अंकात प्रसिद्ध झाली आहे. श्री. टिकेकरांचा चौफेर व्यासंग आणि व्यापक निरीक्षण यांची मला जाणीव आहे. त्याचमुळे त्यांच्यासारख्या साक्षेपी ज्येष्ठ अभ्यासकाने माझा लेख वाचून, त्याची तत्काळ दखल घेतली, याचा मला अभिमान वाटतो.

मी प्रारंभीच अत्यंत नम्रपणे हे स्पष्ट करू इच्छितो की, माझ्या लेखाच्या प्रतिपाद्याशी संबद्ध असलेली बहुतेक प्रातिनिधिक सामग्री पाहून आणि दीर्घकाळ विचार करूनच मी जोतिबाच्या प्रतीकात्मकतेसंबंधीची माझी मते मांडलेली आहेत. अशा प्रकारच्या लेखनात अभ्यासकाने जे दायित्व पाळायचे असते, ते पाळूनच सर्व प्रतिपादन केलेले आहे. या बाबतीत 'घाई करून' आणि 'झटपट वासलात लावून' चालत नाही, याची मला निरंतर जाणीव आहे.

'ज्योतिर्लिंग' संज्ञा आणि शिवोपासना यासंबंधीचे सांप्रदायिकांचे म्हणणे मला पूर्ण परिचित आहे. प्रसिद्ध कीर्तनकार श्री. गौतमबुवा पाठक यांचे सोमनाथासंबंधीचे पुस्तक मी प्रकाशित झाल्याबरोबर विकत घेऊन वाचलेले आहे; एढेच नव्हे, तर श्री. मुळे, श्री. स. कृ. फडके आणि श्री. दंडगे यांची या विषयावरील मराठी पुस्तकेही मी वाचलेली आहेत. सांप्रदायिक मांडणीच्या या पुस्तकांशिवाय, अगदी १९७५ मधील Wendy Doniger O'Flaherty च्या '*Asceticism and Eroticism in the Mythology of Siva*' या ताज्या ग्रंथापर्यंत शिवविषयक संशोधकीय चर्चा मी दृष्टिखाली घातली आहे. यत्किंचितही 'घाई' केलेली नाही.

अर्थात् जोतिबाचा विचार करताना शिवविषयक सांप्रदायिक सामग्रीचा आणि संशोधकीय चर्चांचा संभार धांडोळण्याची गरजही नाही. कारण, लोकधर्माच्या उन्नायकानी जोतिबांचे शिवाशी एकरूपत्व घडविण्याचा कितीही प्रयत्न केलेला असला तरी जोतिबाने आपले शुद्ध लौकिक क्षेत्रपालत्व सोडलेले नाही. त्याचे चरित्र, मूर्तिविधान, उपासनास्वरूप, परिवारदेवता आणि-उत्सवमहोत्सव या सर्वांमधून अगदी निःशंक, निरपवादरीत्या त्याच्या क्षेत्रपालत्वाचा प्रत्यय येतो. प्रतिष्ठित शिवरूपाशी त्याचा लागा-बांधा जुळत नसल्यामुळे, शिवसंबद्ध 'ज्योतिर्लिंग' संज्ञेचा विचार जोतिबाच्या संदर्भात करणे अप्रस्तुत आणि म्हणूनच अनावश्यक ठरते.

मी 'जोत'चा ज्योतीशी संबंध न लावता 'जोता'शी म्हणजे नांगराशी संबंध लावण्यात 'घाई केली आहे,' असे श्री. टिकेकरांना वाटते. परंतु माझे प्रतिपादन केवळ या व्युत्पत्तीवरच आधारलेले आहे, असे नाही. जोतिबाविषयक सामग्रीच्या सर्व अंगांमधून व्यक्त होणारे त्याचे क्षेत्रपतित्व व क्षेत्रपालत्व, त्याच्या 'केदारनाथ' या संस्कृत नावामधील 'केदार' या पूर्वपदातून सूचित होणारे त्याच्या *Female Consort* चे क्षेत्रत्व, या क्षेत्रत्वाला पुष्टी देणारा यमाई-रेणुका या भूदेवीचा जोतिबासंबंध, जोतिबाची रेणुकापती, एकवीरापती ही नावे, त्याचे नागरूपत्व दाखविणाऱ्या नामांचे उपासनावाङ्मयातील स्थान, नागाच्या क्षेत्रपतित्वाविषयीची निःशंक सिद्धी, इत्यादी अनेकानेक प्रमाणांनी मी माझ्या मताची पुष्टी केलेली आहे; केवळ 'जोत' च्या व्युत्पत्तीवरून नव्हे. जर माझी व्युत्पत्ती डावलावयाची असेल, तर मी दिलेल्या या सर्व अन्य प्रमाणांची विल्हेवाट कशी लावायची आणि जोतिबाच्या लौकिक रूपाची, चरित्राची व उपासनेची शिवाशी सर्वांशाने सांगड कशी घालायची, याचे दायित्व व्यासंगी आक्षेपकांकडे जाते. ते त्यांनी सांभाळल्यास मला माझ्या प्रतिपादनाचा पुनर्विचार करण्याची नवी अलक्षित साधने उपलब्ध होतील.

कार्तिकेयाचा– सुब्रह्मण्याचा दक्षिणेत तरी नागराजाशी दृढतम संबंध आहेच आहे. तो मी संशोधन करून स्पष्ट करण्याचा प्रश्नच येत नाही. याविषयीच्या अधिक तपशिलासाठी 'सुब्रह्मण्य : एक आकलन' या माझ्या पूर्व प्रकाशित ('आनंदवन' त्रैमासिक, पुणे, वर्ष २, अंक १) लेखाकडे लक्ष वेधू इच्छितो. अय्यप्पन, शास्ता, अय्यनार, सुरगन इत्यादी नावांनी दक्षिणेत नावाजलेल्या क्षेत्रपाल देवाचे 'हरिहरपुत्र' म्हणून जे चरित्र गाजते आहे, त्याची मला जाणीव आहे. विष्णूच्या मोहिनी रूपावर आसक्त झालेल्या शिवाचा हा पुत्र महाराष्ट्रातल्या क्षेत्रपाळ देवांशी निगडित कसा करता येईल, अशी

श्री. टिकेकरांची शंका आहे. तमिळनाडमधील हा देव मोहिनीरुप हरी आणि मोहिनीवर आसक्त झालेला हर यांचा पुत्र होय, अशी कथा आहे. महाराष्ट्रातील खंडोबा हा एकीकडे स्कंदाशी, तर दुसरीकडे हराशी संबंध जोडण्याच्या प्रयत्नात होता. त्याची पत्नी नेवाशाची म्हाळसा ही नेवासे या स्थानीं तरी पूर्णपणे 'मोहिनी' बनून राहिली आहे. म्हणजे तमिळनाडमध्ये हा क्षेत्रपाळ देव स्वतःला मोहिनीचा पुत्र म्हणवतो, तर महाराष्ट्रात पती म्हणवतो. स्कंदषष्ठी अथवा नागषष्ठी हा तमिळनाड-आंध्र-कर्नाटकात सुब्रह्मण्याचा, मुरुगनचा उत्सवदिन आहे, तर तोच चंपाषष्ठी या नावाने महाराष्ट्रात खंडोबाचा उत्सव-दिन आहे. मातृदेवता पुरुषदेवांना पिता, पुत्र, पती, बंधू या नाना नात्यांनी स्वीकारते, हे मी येथे विस्ताराने सांगण्याची जरूरी नाही. नागरूप सुब्रह्मण्य-मुरुगन आणि मयूरवाहन स्कंदकार्तिकेय यांचे एकत्व कसे सिद्ध होईल, या प्रश्नाच्या उत्तरासाठी सुब्रह्मण्यविषयक दक्षिणेतील सर्व कथासंभार पाहण्याची मी विनंती करतो. अनेक लौकिक श्रद्धांचे उन्नयन आणि संश्लेषण करण्याच्या प्रयत्नात द्वंद्वांचा निरास करण्याची धर्मधुरीणांची सरणी श्री. टिकेकरांना मी स्पष्ट करून सांगण्याची मुळीच आवश्यकता नाही. सुपर्णरूप व सुपर्णवाहन विष्णू हा शेषशायी कसा आणि योगिराज शिव हा ऊर्ध्वमेढ्र कसा, यांसारख्या प्रश्नांच्या उत्तरातच वरील शंकेचे उत्तर आहे अन्यथा, विज्ञानदृष्टीनेच विचार करायचा झाला, तर विषारी नागाला कुलरक्षक, निधिरक्षक, संतानदायक, क्षेत्रपती, क्षेत्रपाल, एवढेच नव्हे तर स्त्रीतत्त्वाचे परम प्रेय असे स्वरूप लोकमानसात लाभण्याचे कसलेच समर्थन होऊ शकणार नाही.

योगेश्वरीच्या उपपत्तीचा माझा प्रयत्न क्षेत्रपालसाहचर्यानेच पहावयाचा आहे. चौसष्ट योगिनी आणि त्यांची उपासना याविषयीची चर्चा मला परिचित आहे. एकच संज्ञा विभिन्न संदर्भात विभिन्न मूलस्रोतातून आलेली असते. तो मूलस्रोत दुर्लक्षून त्या संज्ञेचा अर्थ लावू पाहण्याने अकारण चकव्यात सापडावे लागते. उदाहरणार्थ, होसपेटजवळ कमलचिन्हांकित योनिरूप देवी मूर्तीला 'व्याघ्रेश्वरी' अशी संज्ञा आहे. या संज्ञेचा उलगडा 'व्याघ्रा'वरून कसा करता येईल ? खंडोबाच्या उपासकाला महाराष्ट्रात 'वाघ्या' अशी संज्ञा आहे. या संज्ञेची पारंपरिक स्पष्टीकरणकथा वाघाशी संबद्ध आहे; परंतु प्रत्यक्षात मात्र वाघ्याच्या क्रियेचा कुत्र्याच्या गुरगुरण्याशी संबंध पारंपरिक वाङमयात वारंवार उल्लेखिला गेला आहे. येथे आपण 'वाघ्या'चा 'वाघा'शी प्रथमदर्शनी जाणवणारा चकवणारा संबंध डावलून जसे सत्यशोधनार्थ 'वग्गेय' ( कुत्रा ) कडे वळतो, त्याप्रमाणेच 'योगेश्वरी' या क्षेत्रपाळ भैरवाच्या

सहचारिणीचा नामविचार करावा लागतो. ( पहा : ' शक्तिपीठांचा शोध ' : रा. चिं. ढेरे. मोघेप्रकाशन, कोल्हापूर-पुणे. १९७४; )

' रत्नागिरी'च्या संदर्भातील श्री. टिकेकर यांचा संपूर्ण परिच्छेद अकारण लिहिला गेला आहे. कारण त्या परिच्छेदात त्यानी खंडित केलेले मत माझ्या लेखात उद्‌धृत केलेल्या श्री. भास्करराव जाधवांच्या उताऱ्यातील आहे. मी त्या मताचा कुठेच स्वीकार केलेला नाही. उलट सिंद-शिंदे कुल, त्या कुळातील नागाची प्रतिष्ठा आणि शिंद्यांची जोतिबाभक्ती यांचा अनुबंध माझ्या प्रतिपादनाच्या गाभ्याशी जोडून दाखविला आहे. श्री. टिकेकर यांनी अनवधानाने श्री. जाधवांचे मत हे माझेच मत मानून टीका केली आहे.

' रुद्र, सूर्य, अग्नी यांची एकरूपता दाखविणारी चर्चा ' माझ्या म्हणण्याला बाधक ठरण्याचा मुळीच संभव नाही. कारण माझे प्रतिपादन द्यावा-पृथ्वीच्या ज्या आद्य, सनातन आणि अविच्छिन्न नात्याच्या प्रतीकांशी निगडित आहे, त्या नात्यातील ' द्यौ ' मध्येच सूर्याचा, अग्नीचा अंतर्भाव होतो. कोणी रुद्राला, शिवाला यज्ञाशी निगडित करणारे असले, तरी यज्ञवेदी आणि यज्ञातील अग्निशिखा यांना खुद्द वेदांनीच कोणत्या प्रतीकांनी वर्णिले आहे, याचा मुद्दाम शोध करून सांगण्याची जरूरी नाही.

श्री. टिकेकर यांनी माझ्या प्रतिपादनाचा त्याच्या समग्रतेत पुर्नविचार करावा, अशी माझी त्यांना नम्र विनंती आहे. त्यांच्यासारख्या ज्येष्ठ जाणकाराकडून काही नवे शिकायची आणि स्वतःला दुरुस्त करायची माझी सदैव सिद्धता आहे. मी मतांचा आग्रही नाही; ज्ञानाचा प्रेमी आहे.

—श्री. रा. चिं. ढेरे

अनुक्रमणिका

चर्चा :

डॉ. वसंत स. जोशी

# ज्ञानदेवचरित्रासंबंधी उत्पन्न झालेले काही प्रश्न

'नवभारत' मासिकाच्या संपादनकार्याच्या निमित्ताने तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याशी वारंवार चर्चा करण्याची संधी मला मिळते. या ज्ञानेश्वर जन्म सप्तशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्याशी पुष्कळच विचारविनिमय मी करू शकलो व त्या चर्चेत ज्या अनेक प्रश्नांचा उलगडा झाला, तो असा :

डॉ. वि. भि. कोलते यांनी 'नवभारत'च्या गेल्या ( फेब्रुवारी १९७६ ) अंकात 'ज्ञानदेवांची जातिकुळावेगळी वंशावळीच्या निमित्ताने' या शीर्षकाखाली जो प्रश्न उपस्थित करून उलगडा करण्याचा प्रयत्न केला. त्या प्रश्नाचीही चर्चा अगोदरच झाली होती, हे लक्षात आले. संत नामदेवाच्या 'आदि' मधील "उभयता कुळभ्रष्ट" याचे स्पष्टीकरण संन्याशाचे पुत्र या घटनेनेच मिळते. संन्यासातून परतलेला गृहस्थ हा आरूढपतित ठरतो. तो या जन्मी मृत्यूपर्यंत व्यवहारतः शुद्ध होत नाही, म्हणून बहिष्कृतच राहातो. अशा व्यक्तीशी संन्यासाच्या योगाने पूर्ण संबंधविच्छेद झालेली पत्नी ही पत्नी राहात नाही. त्यामुळे तिने गृहस्थधर्माप्रमाणे शरीरसंबंध केल्यास तीही पतितच ठरते, अशा रीतीने हे संन्याशाचे पुत्र दोन्ही बाजूंनी म्हणजे उभयतः कुलभ्रष्ट ठरतात. असा अर्थ केल्यास तो 'आदि'तील एकंदरीत हकीगतीशी सुसंगत ठरतो.

श्री. ब. स. येरकुंटवार यांनी आपल्या 'श्री ज्ञानदेवांचे अभिनवदर्शन' या अलीकडे प्रसिद्ध केलेल्या पुस्तकात तर्कतीर्थ श्री. जोशी यांनी 'आदि' अभंगांच्या अनुसाराने लिहिलेल्या 'नवभारता'च्या 'ज्ञानेश्वर विशेषांका'तील लेखातील विधानावर संतापून हल्ला केला आहे. त्यात श्री. येरकुंटवार यांनी एक प्रश्न उपस्थित केला आहे. तो असा, की 'ब्रह्मसूत्रशांकरभाष्य' हा धर्मशास्त्र ग्रंथ आहे काय ? हा असा प्रश्न उपस्थितच का व्हावा ? 'प्रस्थानत्रयी' हे वैदिक हिंदूंचे मोक्षधर्मविषयक धर्मशास्त्रही आहे. उपनिषदे आणि भगवद्गीता या दोन प्रस्थानांमध्ये आध्यात्मिक तत्त्वज्ञान मोक्षपुरुषार्थाकरिता उपदेशिलेले आहे. आणि त्या मोक्षपुरुषार्थाची साधना म्हणजे मोक्षधर्मही उपदेशिला आहे. ब्रह्मसूत्रे या दोन प्रस्थानांचीच मीमांसा म्हणजे उत्तरमीमांसा होय. त्यात आध्यात्मिक तत्त्वज्ञानाबरोबरच साक्षात्काराकरिता मोक्ष धर्माचीही चर्चा केली आहे. संन्यास हा मोक्षधर्म आहे, याबद्दल सर्व वैदिक धर्मशास्त्राचे ऐकमत्य आहे.

त्यामुळे ब्रह्मसूत्रे व त्यावरील शांकरभाष्य हे धर्मशास्त्र आहे की नाही अशी शंकाच उपस्थित होऊ शकत नाही.

प्रा. म. रा. जोशी हे एक सुप्रसिद्ध संतसाहित्याचे संशोधक आहेत. त्यांनी 'आदि' अभंगातील संन्यासाचा त्रिदंडी संन्यास असा अर्थ करून 'आदि' मधील विठ्ठलपंतांवरील बहिष्काराचा मुद्दा विसंगत ठरविला आहे. त्रिदंडी संन्यासातून प्रत्यवरोहण हे पातित्यास कारण होत नाही, असे ते सूचित करतात; परंतु त्रिदंडी संन्यासातून गृहस्थाश्रमात परतण्याचा अपवाद कोठेही धर्मशास्त्रात सांगितला नाही. अर्जुनाने सुभद्राहरणाच्या वेळी त्रिदंडी संन्यास घेतला असे जे कथाकार सांगतात, त्यात तो त्रिदंडी संन्यास हे अर्जुनाचे नाटक होते, तो खरा संन्यास नव्हता, हे कथाकारही सांगण्यास विसरत नाहीत; प्रा. म. रा. जोशींनी का विसरावे ? त्रिदंडग्रहण किंवा एकदंडग्रहण हे संन्यासविधीच्यावेळी करावयाचे असते. तीन दंड एकत्र बांधून हातात देण्याचा हा विधी आहे. त्याचा लाक्षणिक अर्थ वाचा, देह आणि मन यांचा संयम म्हणजे त्रिदंड असा केला आहे. काही स्मृतीमध्ये शिखा, यज्ञोपवीत यांचे विसर्जन न केले तरी चालते असा विकल्प सांगितला आहे; परंतु एकदा संन्यास घेतल्यानंतर मग तो कोणताही असो, त्यातून म्हणजे संन्यासाश्रमातून परतणे हे पातकच म्हणून सांगितले आहे. काही स्मृतींच्यामध्ये हे महापाप नाही; ते उपपातक आहे; हे खरे की, उपपातक ही संज्ञा असे सूचित करते की ते दुय्यम पातक असल्यामुळे त्यामुळे पतितत्व हा दोष उत्पन्न होत नाही; परंतु संज्ञेपेक्षा प्रत्यक्ष विधिनिषेध वाक्य म्हणजे श्रुतिप्रमाण हे बलवान आहे. सर्वात बलवान आहे. येथे श्रुति शब्द वेद याअर्थी वापरला नसून पूर्वमीमांसेतील श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, समाख्या अशी जी क्रमाने स्थान, प्रमाणे सांगितली आहेत, त्यातील हा पारिभाषिक शब्द आहे. विधिनिषेध बोधक प्रत्यक्ष श्रवणात येणारा शब्द असा येथे श्रुति शब्दाचा अर्थ आहे व हे पुढील सर्व प्रमाणांपेक्षा सर्वात वरिष्ठ प्रमाण आहे. उपपातक ही समाख्या आहे, म्हणजे सर्वात कनिष्ठ प्रमाण आहे. ब्रह्मसूत्रशांकरभाष्यात त्या संबंधाचे पातित्य बोधक स्मृतिवाक्य दिले आहे –

आरूढो नैष्ठिकं धर्मं यस्तु प्रच्यवते पुनः ।
प्रायश्चित्तं न पश्यामि येन शुध्येत् स आत्महा ॥ –(ब्रह्मसूत्र ३-४-४३.)

हे स्मृतिवाक्य असल्यामुळे शांकरभाष्यात धर्मशास्त्र म्हणजे स्मृति येते की नाही हा प्रश्नच गैर लागू ठरतो.

◆ ◆ ◆ ◆

‘ प्राज्ञ ’ प्रकाशने

## वैदिक संस्कृतीचा विकास

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

मूल्य तीस रुपये

## क्रोचेचे सौंदर्यशास्त्र

प्रा. रा. भा. पाटणकर

मूल्य रुपये दहा

## पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास

डॉ. सुमंत मुरंजन

मूल्य आठ रुपये

## सिंधु संस्कृति, ऋग्वेद व हिंदु संस्कृति

श्री. प्र. रा. देशमुख

मूल्य दहा रुपये

आपल्या संग्रही ठेवीतच !

**प्राज्ञपाठशाळा प्रकाशन**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )

अनुक्रमणिका




